


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३१५

ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर २००५



७९ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष

अनुक्रमणिका

# ८० जी प्रमाणपत्र

म. सा. परिषदेस देणगी देणाऱ्यांना आयकर खात्याकडून '८० जी प्रमाणपत्र' प्राप्त व्हावे म्हणून गेल्या दोन वर्षांपासून परिषदेचे प्रयत्न चालू होते. कळविण्यात आनंद होतो की, हे ८० जी प्रमाणपत्र परिषदेस नुकतेच प्राप्त झाले असून त्याची मूळ प्रत येथे प्रसिद्ध करीत आहोत. देणगीदारांना या प्रमाणपत्राचा निश्चितच उपयोग होईल. परिषदेच्या हितचिंतकांनी परिषदेस अर्थसाहाय्य करून कार्यकर्त्यांना प्रोत्साहित करावे, अशी विनंती आहे. इ. स. २००५-२००६ हे परिषदेचे शताब्दी वर्ष आहे. त्यासाठी विविध योजना व उपक्रम पार पाडण्यासाठी परिषदेतर्फे निधी उभारला जात आहे. सर्वांनी या निधीस सढळ हाताने मदत करावी, अशी विनंती आहे. आता पावतीच्या मागील बाजूस हे ८० जी प्रमाणपत्र मुद्रित करून घेतले जात असल्यामुळे वेगळ्या प्रमाणपत्राची गरज पडणार नाही. १०० वर्षांची वाटचाल पूर्ण करणाऱ्या या संस्थेस नवे-जुने सभासद, हितचिंतक व देणगीदार यांनी आर्थिक साहाय्य करावे, तसे आपल्या परिचितांनाही त्याबद्दल सांगावे, अशी नम्र विनंती. परिषदेस हे ८० जी प्रमाणपत्र प्राप्त होण्यासाठी मदत करणाऱ्या आयकर विभागातील संबंधित अधिकाऱ्यांची परिषद आभारी आहे.

सोबत : ८० जी प्रमाणपत्राची मूळ प्रत

**डॉ. गं. ना. जोगळेकर**
कार्याध्यक्ष, म. सा. प.

**No. Pn/T-I/80G/R 121/131 / 2002-2003**

Donations made to Maharashtra Sahitya Parishad, Tilak Road, Pune– 4110 30., will be eligible for the benefit of deduction u/s 80G of the income-tax Act, 1961, in the hands of the donors subject to the limits and condition prescribed therein.

2. The exemption granted to the above Trust is valid from 1.4.2005 to 31.03.2008 subject to adherance of following :

1. Receipts iss}d to the donors should bear the Ref. No. and date of this order.

2. The return of income accompanied by Statement of Accounts and Income & Expenditure Account, Balance sheet of the ibid Trust/Society to be submitted to the concerned Accessing Officer as per the specified d} date laid fown in the Income Tax Act.

3. If further renewal is required an application in Form No. 10 G should be made to this Office by ibid trust/Society alongwith the statements of accounts for the last 3 years alongwith the copies of acknoledgements of returns of income, and Certificate u/s 13(1) (c) of the I.T. Act, 1961, signed by the Trustees alongwith list of donors of amount of Rs. 500/- & above for the last 3 years.

Sd/-
(S.K. Jha)
Commissioner of Income Tax-I, Pune

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र



# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३१५
ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर २००५



संपादक
डॉ. सु. प्र. कुलकर्णी





**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी (०२०) २४४७५९६३

अनुक्रमणिका





## अनुक्रमणिका



---


**मुद्रक-प्रकाशक** : रवीन्द्र भट, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

**मुद्रणस्थळ** : स्मिता प्रिंटर्स, १०१९ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.

**अक्षरजुळणी** : एच. एम. टाइपसेटर्स, ११२०, सदाशिव पेठ, निंबाळकर तालीम चौक, पुणे ४११०३०.

**किंमत १५/- रुपये**

**प्रकाशन दिनांक** : डिसेंबर २००५


(या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादनसमिती नेहमी सहमत असेलच, असे नाही.)

## संपादकीय

**श्री. मारुती चितमपल्ली यांचे अभिनंदन!**

सोलापूर येथे होणाऱ्या ७९ व्या साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदावर सोलापूरचेच श्री. मारुती चितमपल्ली यांची निवड झाली. 'रानवाटे'ने झालेली ही निवड स्वागतार्ह आहे. त्र्याहत्तर वर्षांच्या आजवरच्या आयुष्यात श्री. चितमपल्ली यांनी निसर्गाच्या सहवासात काम केले; आणि जे अनुभवले, निरखले त्याचेच लेखन केले. १९६७ पासून ते आजपर्यंत त्यांच्या अनुभवजन्य लिखाणातून त्यांनी मराठी साहित्यात निसर्गाच्या विविध घटकांना बोलके केले. निसर्गसाहित्याचे दालन समृद्ध केले. जीवन आणि साहित्य यांचा सुरेख संगम म्हणजे मारुती चितमपल्ली! 'पक्षी जाय दिगंतरा', 'जंगलचं देणं', 'रानवाटा', 'रातवा', 'घरट्यापलीकडे', 'पाखरमाया', 'निसर्गवाचन', 'शब्दांचं धन', 'आनंदाची कमळे' या बरोबरच त्यांच्या संस्कृत साहित्याच्या पारंपरिक अभ्यासाचा प्रत्यय 'मृगपक्षिशाखा' आणि 'आनंदाची कमळे' या ग्रंथांतून येतो. जंगल आणि जंगलचे अनुभव ही साहित्याला नवी वाट दाखविली; म्हणून या वेगळ्या वाटेच्या साहित्यिकाला साहित्यरसिकांनी मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा यथोचित मान दिला आहे. त्यांचे अभिनंदन! महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे तर्फे त्यांचा अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते सत्कार झाला.

**नाट्यसंमेलनाध्यक्षपदी श्री. दत्ता भगत**

८६ व्या नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षपदावर श्री. दत्ता भगत यांची निवड झाल्याबद्दल त्यांचेही हार्दिक अभिनंदन! कथाकार आणि दलित साहित्याचे समीक्षक असलेल्या दत्ता भगत यांच्या नाट्यलेखनाचा प्रभाव सर्व नाट्यरसिकांवर आहे. 'खेळिया', 'वाटा-पळवाटा' आणि 'अश्मक' या नाटकांबरोबर त्यांचे एकांकिकालेखन लोकप्रिय झाले आहे. 'आवर्त' आणि इतर एकांकिका, 'चक्रव्यूह' आणि इतर एकांकिका, 'जहाज फुटलं आहे' आणि इतर एकांकिका हे तीन एकांकिकासंग्रहही प्रयोगशील व विचारप्रवर्तक आहेत. दलित जीवनातील व विशेषत: नवशिक्षित सुसंस्कृत दलित जीवनातील गुंतागुंतीच्या समस्या त्यांनी हळुवारपणे हाताळल्या आहेत. 'दलित साहित्य-दिशा आणि दिशांतर' तसेच 'दलित साहित्य प्रवाहाचा अभ्यास' हे त्यांचे समीक्षाग्रंथ डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठात मराठी विषयाचे प्रपाठक आणि विभाग प्रमुख असलेले आणि दलित रंगभूमीला डोळस वळण देणारे श्री. दत्ता भगत यांचे महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेच्या वतीने अभिनंदन!



अनुक्रमणिका

**कवी केशवसुतांच्या पुण्यस्मरणाची शताब्दी (७ नोव्हेंबर १९०४ ते २००५)**

आशय आणि अभिव्यक्तीच्या सांकेतिकतेच्या बंधनातून मराठी काव्याला मुक्त करणारे, आत्मनिष्ठ आणि समाजाभिमुख काव्याचे उद्‌गाते कवी केशवसुत यांच्या जन्मशताब्दीचे वर्ष महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या शताब्दी महोत्सवातही परिषदेच्या सर्व शाखांनी काव्यस्पर्धा घेऊन साजरे केले. शाखांमधील पारितोषिकप्राप्त कवींचे अंतिम काव्यसंमेलन ७ नोव्हें ०५ रोजी पुण्याला झाले.

**डॉ. इरावती कर्वे यांचे स्मरण (१५ डिसें. १९०५ ते ११ ऑक्टो. १९७०)**

'मानववंशशास्त्र आणि समाजशास्त्र' या विषयाच्या जगन्मान्य अभ्यासक-संशोधक डॉ. इरावती कर्वे यांनी मराठी ललित साहित्यात अत्यंत संवेदनाशील लेखन केले आहे. विद्वत्व आणि रसिकत्व यांचा अपूर्व योग असलेले महाभारताचे समाजमन 'युगान्त'मध्ये चित्रित झाले आहे. 'परिपूर्ती', 'भोवरा', 'गंगाजळ' हे ललित गद्यही लोकप्रिय झाले आहे. भारताची आणि महाराष्ट्राची सामाजिक संस्कृती उकलून दाखविणारे लेखन 'हिंदूंची समाजरचना', 'मराठी लोकांची संस्कृती', 'आमची संस्कृती', 'धर्म', 'महाराष्ट्र एक अभ्यास' इ. १९५२ ते १९७० च्या दरम्यान मोलाची ग्रंथनिर्मिती केली. पुण्याच्या हुजुरपागा शाळेत आणि फर्गसन कॉलेजातून पदवीपर्यंत शिक्षण, जर्मनीतील बर्लिन युनिव्हर्सिटीच्या डॉक्टरेट, एस. एन. डी. टी. महिला विद्यापीठाच्या कुलसचिव, डेक्कन कॉलेज, पुणेच्या संशोधक प्राध्यापिका डॉ. इरावती कर्वे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त हे स्मरण.

**पं. महादेवशास्त्री जोशी (१३ जानेवारी १९०६ ते ११ डिसेंबर १९९२)**

मराठी साहित्याचे 'प्रासादिक लेणे' म्हणजे पं. महादेवशास्त्री जोशी, भारतीय संस्कृतिकोषाचे १० खंडांचे ऐतिहासिक संपादनकार्य त्यांच्या हातून घडले. 'भारतदर्शन'च्या १६ खंडांमधून भारताचे सांस्कृतिक दर्शन घडविणारी ही प्रवासमाला आणि दहा कथासंग्रहांतून संवेदनाशील माणसांच्या जीवनाचे रसरशीत चित्रण हा त्यांच्या साहित्यजीवनाचा आत्मा आहे. वेदान्त, व्याकरण, काव्यशास्त्र यांचा गाढा अभ्यास 'मुलांच्या संस्कृतिकोषात' सुबोध भाषेत प्रकटला आहे. 'आईच्या आठवणी' (तीन भाग), 'मुलांचा नित्यपाठ' हे बालसाहित्य आणि श्री आद्य शंकराचार्यांच्या चरित्रावर आधारित ग्रंथ, 'आमचा वानप्रस्थाश्रम' आणि जोशी पुराण हे आत्मपर लेखन अशा भरघोस साहित्याची देणगी त्यांनी दिली. त्यांच्या जन्मशताब्दी निमित्त महाराष्ट्र साहित्य परिषद विशेष व्याख्याने आयोजित करणार आहे. त्यांना अभिवादन!

## काही लक्षणीय घटना

अथेन्सच्या जॉर्जिया युनिव्हर्सिटीने डॉ. सतीश आळेकर यांचे 'बेगम बर्वे' हे, नाटक संगीत रंगभूमीवर आणले. स्त्री-पात्राची भूमिका करणाऱ्या नटाच्या मानसिकतेवर आधारलेले











शोकात्म नाटक अमेरिकन नटसंचाने सादर केले. तेही मल्टीमिडियाच्या तंत्रसाहाय्याने! त्यासाठी सतीश आळेकरांनी मराठी संगीत रंगभूमीची मानसिकता अमेरिकेत समजून देण्यासाठी घेतलेले विशेष परिश्रम ही लक्षणीय घटना आहे.

मराठी विज्ञान साहित्यात मोलाची भर टाकणारे, पुणे विद्यापीठाच्या 'आयुका' चे प्रमुख डॉ. जयंत नारळीकर औपचारिकरीत्या निवृत्त झाले तरी संशोधनकार्याला आणि उमलत्या कुमारवयातच बालवैज्ञानिकांना प्रेरणा देण्याच्या कार्याला अविरत वाहून घेण्याचा त्यांचा मनोदय मराठी विज्ञानसाहित्यालाही आशादायी आहे.

लोकमान्यांच्या **'दैनिक केसरी'ला** १२५ वर्षे झाली. सव्वाशे वर्षांपूर्वीची सिंहगर्जना महाराष्ट्राच्या स्मरणातून कधीही जाणार नाही. तसेच डॉ. ना. भि. परुळेकरांचा 'सकाळ' ७५ वर्षांचा झाला. ह्या दोन परंपरांचे अभिनंदन!

राज्यशास्त्र आणि अर्थशास्त्राचे प्राध्यापक व फर्गसन कॉलेजचे प्राचार्य, टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे माजी कुलगुरू डॉ. वि. मा. बाचल यांना 'संत नामदेव पुरस्कार' मिळाला. भाई फुटाणे प्रतिष्ठानच्या वतीने हा पुरस्कार दिला जातो.

अमरावतीच्या जनसाहित्य परिषदेने सौ. वैशाली श्रीकृष्ण भालसिंग, अहमदनगर यांना 'फकीरा - एक आकलन' या मुंबईच्या लोकवाङ्मयगृहाने प्रकाशित केलेल्या त्यांच्या समीक्षाग्रंथास 'जनसारस्वत पुरस्कार' दिला. त्यांचे अभिनंदन!

## श्रद्धांजली!

या वर्षी दसरा ते दिवाळी या दरम्यान साहित्य आणि संस्कृती क्षेत्रातील अनेक महनीय व्यक्तींचे निधन झाले. महाराष्ट्र साहित्यपरिषदेने त्यांना विशेष कार्यक्रम आयोजित करून श्रद्धांजली वाहिली. त्याचे कार्यवृत्त या अंकात आहे.

आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या लेखिका अमृता प्रीतम, भारताचे भूतपूर्व अर्थमंत्री प्रा. मधू दंडवते, ख्यातनाम लेखिका आणि गायिका योगिनी जोगळेकर, ज्येष्ठ पत्रकार स. मा. गर्गे, तरुण कवयित्री शैला सायनाकर, हिंदीभाषी साहित्यिक निर्मल वर्मा यांना महाराष्ट्र साहित्य परिषदेची श्रद्धांजली!

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी, संपादक**
७, गायकवाड कॉलनी, सावेडीरोड,
अहमदनगर ४१४००३
दूरभाष : (०२४१) २४२९७५५

---

*ताजा कलम : (संपादकीय लिहिल्यानंतर महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र फौंडेशन इ. पुरस्कार जाहीर झाले; त्या सर्व पारितोषिकप्राप्त साहित्यिकांचे अभिनंदन!)*



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

परिषदेच्या पंचवार्षिक (सन २००६ ते २०११)

## निवडणुकीसंबंधी निवेदन

**● निर्वाचन मंडळाने निश्चित केलेला निवडणुकीचा कार्यक्रम ●**

१) दि. २१/१२/२००५ पासून : मतदारयादी परिषदेच्या कार्यालयात रु. २५० मूल्य भरून घेता येईल.

२) दि. २९/१२/२००५ पासून : उमेदवारांसाठी आवेदनपत्र उपलब्ध होईल. आवेदनपत्राचे शुल्क रु. १००/- फक्त राहील.

३) दि. १/१/२००६ ते दि. १०/१/२००६ : आवेदनपत्रे स्वीकारण्याची मुदत (रात्री ८ वाजेपर्यंत)

४) दि. ११/१/२००६ : आवेदनपत्रांची छाननी व वैध आवेदनपत्रे जाहीर करणे.

५) दि. १२/१/२००६ ते दि. २४/१/२००६ : उमेदवारी अर्ज मागे घेण्याची मुदत (रात्री ८ वाजेपर्यंत)

६) दि. २५/१/२००६ : उमेदवारांची अंतिम यादी जाहीर करणे.

७) दि. २५/१/२००६ ते दि. ४/२/२००६ : मतपत्रिका छपाई व मतपत्रिका मतदारांकडे पाठवण्याची मुदत.

८) दि. ६/२/२००६ ते दि. ४/३/२००६ : मतपत्रिका-मतदारांकडून परत येण्याची-अंतिम मुदत (रात्री ८ वाजेपर्यंत)

९) दि. ५/३/२००६ : सकाळी ९ वाजल्यापासून मतमोजणी व निकाल जाहीर करणे.

निर्वाचन मंडळाने निश्चित केलेले नियम महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यालय व परिषदेच्या जिल्हावार शाखा येथे पाहण्यासाठी उपलब्ध आहेत. इच्छुक उमेदवारांनी रु. १००/- फक्त भरून आवेदनपत्र **महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११०३०** येथून घेऊन जावे किंवा पोस्टाने मागणी करावी.

**अध्यक्ष,**
निर्वाचन मंडळ.



अनुक्रमणिका






## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे.

१.१.२००१ पासून अमलात आलेल्या म. सा. प. घटनेमधील
निवडणूकविषयक कलमे–११ (अ) ते ११ (ऐ)

**११. निवडणूक**

(अ) परिषदेच्या कार्यकारी मंडळाची निवडणूक दर पाच वर्षांनी होईल. ही निवडणूक गुप्त मतदानपद्धतीने व लेखीस्वरूपात होईल. प्रचलित कार्यकारी मंडळाचा पंचवार्षिक कार्यकाल संपण्यापूर्वी सुमारे १५ दिवस आधी नव्या कार्यकारी मंडळाच्या निवडणुकीचा निकाल जाहीर होईल.

(आ) परिषदेच्या खालील पदाधिकाऱ्यांची निवड परिषदेच्या सर्व सभासद मतदारांनी करावयाची आहे.

१) कार्याध्यक्ष, २) कोषाध्यक्ष, ३) प्रमुख कार्यवाह

(**टीप :** पुणे महानगरपालिका क्षेत्रात (पुणे लष्करसह) राहणारे परिषदेचे **आजीव सभासदच** वरील पदांसाठी उभे राहण्यास पात्र आहेत.)

(इ) कार्यकारी मंडळाच्या सभासदांची खाली दर्शविल्याप्रमाणे क्षेत्रवार आणि संख्यातत्त्वांवर निवड करण्यात येईल. यासंबंधीचे निकष पुढीलप्रमाणे :

१) जिल्ह्यामध्ये किमान ५० (पन्नास) आजीव सदस्य असल्यास त्या जिल्ह्याचा कार्यकारी मंडळावर एक प्रतिनिधी असेल.

२) ज्या जिल्ह्यातील आजीव सदस्यसंख्या ५०० (पाचशे) पूर्ण असेल, त्या जिल्ह्याचे कार्यकारी मंडळावर २ (दोन) प्रतिनिधी निवडले जातील.

३) ज्या जिल्ह्यातील आजीव सदस्यसंख्या एक हजार किंवा अधिक असेल, त्या जिल्ह्याचे कार्यकारी मंडळावर ३ (तीन) प्रतिनिधी निवडले जातील.

४) कोणत्याही जिल्ह्याचे कार्यकारी मंडळावर जास्तीत जास्त तीन प्रतिनिधी असतील.

५) पुणे महानगरपालिका क्षेत्र (पुणे लष्करसह) या विभागातून कार्यकारी मंडळावर तीन सर्वसाधारण प्रतिनिधी व ६ (सहा) विशेष प्रतिनिधी असे एकूण ९ (नऊ) प्रतिनिधी निवडण्यात येतील.

६) पुणे महानगरपालिका क्षेत्रातील सभासदांनी एकूण जे ९ प्रतिनिधी निवडायचे आहेत त्यांची विभागणी खालीलप्रमाणे राहील :

१. इतर जिल्ह्यांप्रमाणे ३ साधारण प्रतिनिधी.

२. केंद्र कार्यालयातील खालीलप्रमाणे जबाबदारी पार पाडण्यासाठी ६ विशेष प्रतिनिधी.

हे सर्व प्रतिनिधी **'स्थानिक कार्यवाह'** असतील व खालील विभागांचे निमंत्रक असतील :

स्था.का.क्र. १) वर्षभरातील व्याख्याने, स्मृतिदिन इत्यादी कार्यक्रम.

स्था.का.क्र. २) समारंभपूर्वक पारितोषिके द्यावयाचे कार्यक्रम व त्या त्या वर्षातील विशेष कार्यक्रम.

स्था.का.क्र. ३) वार्षिक ग्रंथनिवड (वार्षिक ग्रंथपारितोषिकांसाठी).

स्था.का.क्र. ४) परीक्षा विभाग.

स्था.का.क्र. ५) ग्रंथालय विभाग.

स्था.का.क्र. ६) अतिथिनिवास व्यवस्थापक, वास्तू देखभाल.

निवडणुकीत या ६ प्रतिनिधींसाठी वेगळे आवेदनपत्र असेल. आपण कोणती जबाबदारी स्वीकारीत आहोत, ते संबंधित उमेदवाराने त्यात नमूद केले पाहिजे.

(ई) **पुण्यातील 'स्थानिक कार्यवाह' पदांवरील प्रतिनिधींसाठी विशेष नोंद :** विशिष्ट कामाची जबाबदारी स्वीकारलेली संबंधित व्यक्ती ते काम पार पाडू शकत नसेल तर पदाधिकारी समिती याबाबत निर्णय घेईल व त्या व्यक्तीस जबाबदारीतून मुक्त करण्यात येईल. **असे झाल्यास त्या व्यक्तीचे कार्यकारी मंडळावरील प्रतिनिधित्व संपुष्टात येईल. त्याच्या जागी दुसऱ्या व्यक्तीची नियुक्ती कार्यकारी मंडळ करील.**

(उ) निर्वाचन मंडळावरील जागा रिकामी झाल्यास मंडळाच्या इतर दोन सदस्यांनी तिसऱ्या जागेवर योग्य व्यक्तीची निवड करावी.

(ऊ) कार्यकारी मंडळाने निवडणुकीसाठी मतदानास पात्र असलेल्या मतदार सभासदांची यादी निवडणुकीच्या निकालाच्या दिवसापूर्वी तीन महिने आधी जाहीर करावी व तिची एक प्रत निर्वाचन मंडळाच्या स्वाधीन करावी.

(ए) निवडणुकीच्या निकालाच्या दिवसाच्या निदान एक ते दीड महिना अगोदर सूचित उमेदवारांची नावे सूचक व अनुमोदक यांच्या सूचित उमेदवाराच्या सहीसह निर्वाचन मंडळाकडे लेखी स्वरूपात अर्जाच्या विहित छापील नमुन्यात दाखल होणे आवश्यक आहे. सूचक, अनुमोदक आणि सूचित उमेदवार मतदार यादीतील परिषदेचे आजीव सभासद असले पाहिजेत. निवडणुकीच्या मतपत्रिका मतदारांकडे निवडणुकीच्या निकालाच्या दिवसाच्या निदान तीन आठवडे आधी टपालाने रवाना झाल्या पाहिजेत.

(ऐ) निवडणुकीस पात्र असलेल्या सभासदांचे नाव एकापेक्षा अधिक पदांसाठी सुचविता येईल; परंतु प्रत्यक्ष निवडणुकीत फक्त एकाच पदासाठी संबंधित उमेदवारास उभे राहता येईल.

(अं) प्रत्येक आवेदनपत्रासाठी शुल्क रु. १००/- फक्त राहील. कोणत्याही कारणास्तव ही रक्कम परत मिळणार नाही.

# सीमाप्रश्नासंबंधीचे ठराव



**गं. ना. जोगळेकर**

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाची बैठक रविवार, दि. २७/११/२००५ रोजी परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात भरली होती. बैठकीच्या अध्यक्षस्थानी कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर होते. या बैठकीत बेळगाव महानगरपालिकेच्या बरखास्तीच्या संदर्भात सीमाप्रश्नासंबंधी अनेक ठराव संमत करण्यात आले. परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी, उपाध्यक्ष डॉ. आनंद यादव, विश्वस्त डॉ. प्र. चिं. शेजवलकर, न्या. प्र. ना. बेहेरे व डॉ. वि. वि. घाणेकर तसेच कोषाध्यक्ष श्री. रत्नाकर कुलकर्णी व प्रमुख कार्यवाह श्री. रवींद्र भट हे मान्यवर या बैठकीस उपस्थित होते. यावेळी सीमाप्रश्नासंबंधी एकमताने संमत झालेले ठराव खालीलप्रमाणे :

**बेळगाव : सीमाप्रश्नासंबंधी ठराव**

**१) बेळगावकरांना पाठिंबा :** बेळगाव महानगरपालिकेच्या सदस्यांनी सीमाभागाचा समावेश महाराष्ट्रात करण्याबद्दल ठराव करून सीमावासीयांचे मनोगत लोकशाही मार्गाने व्यक्त केले याबद्दल ही बैठक बेळगाव महानगरपालिकेचे अभिनंदन करून त्यांच्या निर्णयास संपूर्ण पाठिंबा देत आहे.

**२) कर्नाटक शासनाचा निषेध :** बेळगाव-महानगरपालिकेच्या ठरावानंतर बेळगावचे महापौर **श्री. विजय मोरे** व त्यांचे सहकारी बंगळूर येथे गेले असताना त्यांना अपमानित करून मारहाण करण्याचे निंद्य कृत्य तेथील महाराष्ट्रद्वेष्ट्या काही व्यक्तींनी केले याबद्दल म. सा. प. ची ही बैठक गैरकृत्य करणाऱ्यांचा निषेध करीत आहे. अशा कन्नडिगांवर कायदेशीर कृती न करता त्यांना मोकळे सोडणाऱ्या कर्नाटक शासनाचा म. सा. प. चे कार्यकारी मंडळ तीव्र निषेध करीत आहे.

**३) कर्नाटक शासनाचा धिक्कार :** लोकशाही मार्गाने बेळगावकरांनी आपले म्हणणे मांडले असतानाही बेळगाव महानगरपालिका बरखास्त करण्याचा लोकशाहीविरोधी निर्णय घेऊन तातडीने तशी कृती करणाऱ्या कर्नाटक शासनाचा म.सा.प.ची ही बैठक निषेध करीत आहे व हिंसेला प्रोत्साहन देणाऱ्या कर्नाटकच्या मुख्यमंत्र्यांचा धिक्कार करीत आहे.

**४) महाराष्ट्र शासनास विनंती :** महाराष्ट्र शासनाने कर्नाटकातील या अन्यायकारक घटनांची त्वरित दखल घेऊन कर्नाटकाचा सनदशीर मार्गाने प्रतिकार करण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना करून देशपातळीवर कर्नाटक-शासनाच्या दुष्कृत्यांचा निषेध करावा व पन्नास वर्षे रेंगाळत पडलेला हा सीमाप्रश्न लोकशाही मार्गाने उचित स्वरूपात कायमचा सोडविण्यास केंद्र शासनास भाग पाडावे अशी म. सा. प. या संस्थेची महाराष्ट्राच्या शासनास विनंती आहे.

**५) महाराष्ट्र शासनास आवाहन :** सीमा प्रश्न गेल्या दोन वर्षांपासून सर्वोच्च न्यायालयात पडून आहे. तो त्वरित सुटण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना महाराष्ट्र शासनाने त्वरित करावी अशी मागणी म. सा. प. ही संस्था महाराष्ट्र शासनास करीत आहे.

राज्यपुनर्रचनेनंतर लोकशाही मार्गाने प्रतिकार करणाऱ्या सीमा भागातील मराठी जनतेवर कर्नाटक शासन अन्यायच करीत राहिले आहे. घटनेने भाषिक अल्पसंख्य असलेल्या जनतेला काही अधिकार दिले आहेत. त्याची कर्नाटक शासन केवळ पायमल्ली करीत आहे. एकाकी पडलेल्या सीमाभागातील मराठी जनतेला सर्वतोपरी साहाय्य करणे हे महाराष्ट्र शासनाचे, मराठी जनतेचे व केंद्र शासनाचे कर्तव्य आहे. १९४६ साली महाराष्ट्र साहित्य परिषदेने आयोजित केलेल्या साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावर प्रथमत: संयुक्त महाराष्ट्राचा ठराव बेळगाव येथेच संमत करण्यात आला. तेव्हापासून या सीमाप्रश्नाचा पाठपुरावा म. सा. परिषद करीत आहे. महाराष्ट्रातील सर्व वाङ्मयीन, शैक्षणिक व सामाजिक संस्थांनी सीमाप्रश्नाच्या सोडवणुकीसाठी ठराव करून त्याची प्रत म. सा. परिषदेकडे त्वरित पाठवावी. सर्व मराठी जनतेच्या वतीने या प्रश्नासंबंधी उपाययोजना करण्यासाठी साहित्य संस्था अवश्य पुढाकार घेतील असा विश्वास वाटतो.

महाराष्ट्रातील सर्व साहित्य संस्था व लहान-मोठी वाङ्मयीन मंडळे यांनी या प्रश्नाचे गांभीर्य ओळखून त्वरित वरीलप्रमाणे कृती करावी अशी सर्व मराठी जनतेला म. सा. परिषदेची विनंती आहे.

**गं. ना. जोगळेकर**
कार्याध्यक्ष
म. सा. परिषद, पुणे

---

## साभार पोच

**दशक्रिया :** बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ २८८
**वराहपालन :** विलास गाजरे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ ११२
**खरवड :** केशव मेश्राम, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ १२६
**अंगठे बहाद्दर झिंदाबाद :** सय्यद अल्लादिन, बबलू छबलू प्रकाशन, आष्टी, पृष्ठ ३६










# ज्ञानर्षि स. मा. गर्गे



**प्रा. दत्ता भगत**

कोशकार स. मा. गर्गे गेले. अलीकडे ते आजारीच होते. त्यामुळे काळ कोणत्या बेसावध क्षणी त्यांच्यावर झडप घालेलं, याचा काहीच नेम नव्हता. त्यामुळे मी सोलापूर येथे एका कार्यक्रमानिमित्त गेलो असता ही दु:खद बातमी मला कळली. मन सुन्न झाले. त्यांच्या अनेक आठवणींनी गलबलून गेलो.

गर्गेसरांचं-माझं नातं दुहेरी होतं. मी कधी त्यांच्या वर्गात बसून शिक्षण घेणारा विद्यार्थी नव्हतो. पण प्रत्यक्ष भेट घेऊन, पत्राद्वारे चर्चा करून त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ घेणारे जे असंख्य विद्यार्थी महाराष्ट्रात असू शकतील अशा विद्यार्थ्यांपैकी मी एक होतो. हे माझं-त्यांचं पहिलं नातं आणि त्यांच्या मुलाचा संजयचा मी मित्र होतो. 'आवर्त', 'खेळिया', 'वाटा-पळवाटा' ही माझी नाटकं पुण्याच्या ज्या नाट्यसंस्थेनं केली त्या ड्रॉपर्सचा संजय संस्थापक सदस्य. सरांशी कौटुंबिक संबंध निर्माण व्हावेत असं सरांचं आणि माझं हे दुसरं नातं होतं. सरांनी माझी ही तिन्ही नाटकं पाहिली होती. खूप कौतुकही केलं होतं. पण हे कौतुक केवळ एका वडीलधाऱ्या रसिकानं केलं नव्हतं; हे कौतुक करणारा माणूस ज्ञानक्षेत्रात फार मोठा दबदबा असणारा एक विनम्र ज्ञानर्षीही होता, त्यामुळेही माझं मन मोहरून निघालं होतं.

सरांची-माझी जी पहिली पत्रभेट झाली ती त्यांच्या एका पुस्तकामुळे. त्यावेळी ते पत्रकारितेच्या क्षेत्रातही मोठे विद्वान आणि इतिहासाचे साक्षेपी अभ्यासक आहेत हे मात्र मला मुळीच माहीत नव्हतं. त्यांना मी 'शांतिपर्वातील कथा' या पुस्तकामुळे ओळखत होतो बहुधा.

हाती पडेल ते वाचायचं या सवयीमुळे कॉलेजच्या ग्रंथालयासाठी पुस्तकांची निवड करताना केवळ मलपृष्ठावरचा मजकूर वाचून मी पुस्तक निवडत नसे. त्याऐवजी लेखकाचे मनोगत, मध्येच एखादे प्रकरण असं वाचून मगच निवड करीत असे. असाच एकदा ग्रंथ निवड करताना 'घोरपडे घराण्याचा इतिहास' हे पुस्तक माझ्या हाती लागलं आणि बसल्या ठिकाणीच मी ते वाचून पूर्ण केलं. पुस्तक बहुधा शंभर पानांच्या आसपास होतं; पण विवेचनातील भाषेचा बाज आणि ओघ इतका आकर्षक, की कादंबरी वाचावी इतक्या सहजपणे मी ते पुस्तक वाचून संपवलं. ही घटना बहुधा २७-२८ वर्षांपूर्वीची. 'दलितांचे

प्रश्न : समज आणि गैरसमज' या मीच निश्चित केलेल्या विषयावर अनेक ठिकाणी व्याख्यानं देत होतो. माझ्या व्याख्यानासाठी तपशील मिळवत होतो. या पुस्तकामुळे असाच काही तपशील मिळू शकेल म्हणून माझं कुतूहल चाळवलं. हे पुस्तक गर्गेसरांनी लिहिलेलं होतं, पण माझा-त्यांचा प्रत्यक्ष परिचय मात्र नव्हता.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या उदयापूर्वी गांधीजींच्या सामाजिक ध्येयधोरणाचा त्या काळातील राजे-महाराजे यांच्या मनावरही परिणाम झाला होता. सोंडूर या लहानशा तालुक्याएवढ्या- संस्थानचे राजे घोरपडे हेही त्यांपैकी एक. म. गांधींच्या विचाराने प्रभावित होऊन सोंडूरच्या या राजाने मंदिरप्रवेशाचा निर्णय घेऊन एक फतवा काढला होता, अशी नोंद या पुस्तकात होती. मला त्या फतव्याचे मुळाबरहुकूम टेक्स्ट वाचावे अशी जिज्ञासा निर्माण झाली; पण त्या फतव्याचा मजकूर मात्र पुस्तकात नव्हता. त्या पुस्तकावरील पत्त्याच्या आधारे परिचय नसताना मी गर्गेसरांना पत्र लिहिलं. पत्रात मी त्यांना दोन प्रश्न विचारले. माझा पहिला प्रश्न होता, घोरपडे महाराजांच्या मंदिरप्रवेशाच्या निर्णयाचा मसुदा वाचायला मिळू शकेल का? आणि दुसरा प्रश्न होता, ज्या अर्थी महाराजांनी हा निर्णय घेतला, त्या अर्थी त्यांचे संस्थान अस्तित्वात असेपर्यंत असे एखादे प्रकरण उद्भवले का, ज्यामुळे दोषीला शिक्षा झाली? पत्र तर पाठवले, पण सर उत्तर देतील असे मात्र मला मुळंच वाटले नव्हते. त्याचे कारण एक तर मी कुणी इतिहास विषयाचा प्राध्यापक नव्हतो किंवा कुणी लौकिक असलेला लेखकही नव्हतो; पण आश्चर्य घडले. सरांचे उत्तर आले. तो मजकूर संबंधित संस्थानिकांकडून मिळवून पाठवीन असे आश्वासन त्यांनी दिले होते. पुढचे आश्चर्य असे की, सुमारे दोन महिन्यांनी त्यांनी मला ही सर्व माहिती पुरवली. महाराजांचे वय त्यावेळे ८० वर्षांचे असल्यामुळे सर्व माहिती त्यांच्या कार्यालयीन चिटणीसांकडून मिळवून पाठवली आहे, अशी टीप लिहिण्यासही ते विसरले नाहीत. अत्यंत सामान्य पण कुतूहल आणि जिज्ञासा असणाऱ्या वाचकाची भूक लक्षात घेऊन आपला अमूल्य वेळ देणाऱ्या सरांबद्दल माझ्या मनात आदरभाव निर्माण झाला.

सामान्यपणे अतिशय पुरोगामी कायदे केले जातात, त्या कायद्यांची अंमलबजावणी करण्याची वेळच येत नाही. त्याचे दोन अर्थ असतात. एक तर जनतेने असे कायदे निमूटपणे स्वीकारलेले असतात किंवा जनतेच्या प्रतिगामी व स्थितिशील मनोवृत्तीचे दडपण एवढे असते, की कायद्याच्या अंमलबजावणीचा प्रश्नच उद्भवत नाही. मंदिरप्रवेशाच्या बाबत असेच घडले आहे. सोंडूर संस्थानातसुद्धा असा प्रश्न कधी उद्भवलाच नव्हता, ही माहिती मला सरांकडून मिळाली. समाजसुधारणेचे सर्व कायदे अशावेळी निरर्थक ठरत असतात, हा माझा तर्क सरांनी दिलेल्या माहितीमुळे निष्कर्ष म्हणून मला सांगता येणे शक्य झाले. 'दलितांचे प्रश्न : समज आणि गैरसमज' हा व्याख्यानविषय माझ्या ज्या काही युक्तिवादामुळे श्रोत्यांना तर्कसंगत वाटत होता, त्यात वरील तपशिलाने मौलिक भर घातली होती.

पुढे सरांची प्रत्यक्ष ओळख झाली. स.मा. गर्गे हे विद्वान गृहस्थ संजयचे वडील आहेत हे कळल्यामुळे माझ्या संबंधास कौटुंबिक जिव्हाळ्याचे परिमाण लाभले आणि नांदेडचे प्रसिद्ध अस्थितज्ज्ञ-माझ्या लेखी एक अत्यंत चांगले नाट्यकलावंत, ज्यांची 'जनावर' ही एकांकिका मी पाहिली आहे, बहुधा तेच ती भूमिका आता विसरूनही गेले असावेत- असे डॉ. खुरसाळे हे संजयचे मामा आहेत हे कळल्यावर केव्हाही सरांशी चर्चा करण्याचा, बोलण्याचा आता आपला हक्कच आहे इतकी जवळीक त्यांच्याशी निर्माण झाली.

माझा गर्गेसरांशी असा जिव्हाळ्याचा परिचय आहे, ही माहिती प्रशासकीय परीक्षा देऊ इच्छिणाऱ्या नांदेडच्या दोन विद्यार्थ्यांनी कुठून मिळवली मला माहीत नाही. त्यांना पुण्यास 'मराठवाडा मित्रमंडळाच्या' वसतिगृहात प्रवेश हवा होता. त्यासाठी गर्गेसरांच्या नावे चिठ्ठी द्यावी, अशी मागणी करायला हे विद्यार्थी माझ्याकडे आले.

मराठवाडा मित्रमंडळ ही शिक्षणसंस्था पुण्यात शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या मराठवाड्यातल्या विद्यार्थ्यांना आधार देणारी एक फार महत्त्वाची संस्था आहे. गर्गेसर ह्या संस्थेचे केवळ संस्थापक नव्हते, तर ते क्रियाशील सदस्य होते. आपल्या मराठवाड्यातील आजच्या अनेक नेत्यांनी पुणे येथे शिक्षण घेताना या संस्थेचा लाभ घेतला आहे. स्वत: मा. विलासरावजी देशमुख– महाराष्ट्राचे आजचे मुख्यमंत्री– हेही काही काळ तेथील वसतिगृहात वास्तव्याला होते असे मला ऐकून माहीत आहे. अशा या संस्थेत राहण्यासाठी ते विद्यार्थी मला 'गर्गेसरांना चिठ्ठी द्या' असे सांगत होते. माझ्यावर प्रचंड दडपण आले. एवढ्या मोठ्या माणसाला चिठ्ठी कशी द्यावी? मन धजावत नव्हते; पण समोरच्या विद्यार्थ्यांचीही अडचण होतीच. अखेर मी मनाचा हिय्या करून सरांना चिठ्ठी दिली. काही दिवसांनंतर ती मुले मला भेटली. सरांनी माझ्या चिठ्ठीचा आदर कसा केला, हे त्यांनी मला सांगितलं. त्या मुलांची अडचण दूर झाली होती; पण मी मात्र मनातल्या मनात सरांच्या औदार्यानं भारावून गेलो होतो. आपल्या मोठेपणाचे, विद्वत्तेचे समोरच्या सामान्य माणसांवर मुळीच दडपण पडता कामा नये, हे जाणीवपूर्वक नव्हे तर अगदी अंगवळणी पडल्याप्रमाणे सर वागत असत. त्यामुळे हळूहळू माझीही भीड चेपत गेली. मी त्यांच्या मुलाचा मित्र आहे, हे माहीत असूनही त्यांच्याशी बरोबरीच्या नात्याने चर्चा करण्याएवढा धीट झालो आणि सरांनीही बरोबरीची वागणूक देताना माझ्या वयाचा उणेपणा मला जाणवू दिला नाही.

सरांचे समाज-विज्ञान कोशाचे कार्य म्हणजे ज्ञानाच्या क्षेत्रातला एक दीपस्तंभ आहे. कोशकाराला ललित लेखकासारखी लोकप्रियता मिळत नसते, पण त्याच्या कार्याचे मोल दीर्घजीवी असते. लेखक आणि विद्वान या दोहोंच्या घडणीत कोश एक पायाभूत काम करीत असतो. कोश संपादित करताना मी त्यांना जवळून पाहिले आहे. त्यांच्या कार्याला एक स्वयंशिस्त होती. पण स्वयंशिस्तीने घडणाऱ्या माणसात अहंकाराचे जे काटेरीपण असते त्याचा लवलेशही तिथे नव्हता. सरांनी ही ऋजुता कुठून मिळवली असेल? सरांनी

आपल्या घराचे नाव 'ज्ञानेश' ठेवले आहे. या नावाशी त्यांचे काही व्यक्तिगत नाते असेलही, पण या नावामुळे मला आठवतात ते ज्ञानेश्वर. ज्ञानेश्वरीतील कवीचे जे विलोभनीय असे, नम्र व्यक्तित्वाचे जे काही दर्शन घडते तेच कदाचित 'ज्ञानेश' हे नाव ठेवताना सरांच्यासमोर असावे असे वाटते.

सेवानिवृत्तीनंतर महाराष्ट्रातील जाति-जमातींचा कोश संपादित करायचे काम हाती घ्यावे अशी गेल्या ५-६ वर्षांपासून माझ्या मनात इच्छा आहे. ५-६ वर्षांपूर्वी मी याबाबत सरांशी बोललोही होतो. पद्मविभूषण गोविंदभाई प्रतिष्ठानने या माझ्या प्रस्तावाला अलीकडेच मान्यताही दिली आहे; पण माझ्या अन्य व्यापांमुळेच मला अजूनही हे आवडीचे, छंद म्हणून स्वीकारलेले काम सुरू करता आलेले नाही. प्रत्यक्ष काम सुरू करण्यापूर्वी केव्हातरी पुन्हा एकदा गर्गेसरांना भेटावे, त्यांचे मार्गदर्शन घ्यावे असे मी ठरविलेही होते; पण अनेक वेळेला भेट घेऊनही विशिष्ट हेतू ठेवून, घ्यावयाची ही भेट राहून गेली, याची खंत मात्र सतत राहणार आहे.

**प्रा. दत्ता भगत**
मराठी विभागप्रमुख
डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद

❑

---

## साभार पोच

**वाङ्मयेतिहासाची संकल्पना :** संपादक, द. दि. पुंडे, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठ २४०
**स्पीड पोस्ट :** अनुवाद– अपर्णा वेलणकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ ३५२
**इंदिरा डइंदिरा गांधी नेहरू यांचे जीवनचरित्र. :** अनुवाद– लीना सोहनी, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ ५८८
**द रॉन्देंव्हू :** अनुवाद– अशोक पाध्ये, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ ३१४
**फ्रॉम रशिया विथ लव्ह :** अनुवाद– विजय देवधर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ ३५८
**गोष्टी माणसांच्या :** अनुवाद– लीना सोहनी, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ १६८
**द जॉय ऑफ कॅन्सर :** अनुवाद– माधुरी शानभाग, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ १८०
**अंतरपर्व :** अनुवाद– सुनीता अशोक देशपांडे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ १३२
**ॲज आय सी. :** अनुवाद– माधुरी शानभाग, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ ३२०
**म्हणे कबीर दिवाण :** अनुवाद– भारती पांडे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ १५४
**माझं नांव भैरप्पा :** अनुवाद– उमा कुलकर्णी, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ४४६
**शोध राजीव हत्येचा :** अनुवाद– सारंग दर्शन, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ २७८



अनुक्रमणिका






# साहित्य परिषद आणि 'आनंद' कर्ते



**म. श्री. दीक्षित**

योगायोग कसे जुळून येतात पाहा. महाराष्ट्र साहित्य परिषद या संस्थेची शताब्दी २७ मे २००६ रोजी येते आणि 'आनंद' मासिकाची शताब्दीसुद्धा २००६ सालीच साजरी होत आहे. याहीपेक्षा आणखी विशेष योग म्हणजे 'आनंद'चे संस्थापक-संपादक वा. गो. आपटे हे साहित्य-परिषदेचे संस्थापक-चिटणीस होते. १९०६ ते १९०८ या काळात वा. गो. आपटे, वि. ल. भावे आणि कृ. प्र. ऊर्फ काकासाहेब खाडिलकर हे तिघे परिषदेचे पहिले चिटणीस होते. आपटे तर १९१२ आणि १९१५ या दोन वर्षी पुन्हा चिटणीसपदावर होते.

साहित्य परिषद आणि वा. गो. आपटे यांचा संबंध प्रथम जडला तो १९०६ च्या पुणे येथील चौथ्या ग्रंथकार संमेलनात. किंबहुना हे संमेलन भरविण्यात त्यांचाच पुढाकार असावा. आपटे (१८७१ ते १९३०) खानदेशातील धरणगावचे. त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण धुळे येथे झाले नि उच्च शिक्षण इंदूर व नागपूर येथे झाले. १८९३ साली कलकत्ता विद्यापीठातून त्यांनी बी. ए. पदवी मिळवली. नंतर नू. म. वि. पुणे, इंदूर येथे त्यांनी शिक्षक म्हणून नोकरी केली. नामदार गोखले यांच्या विनंतीनुसार १९०३ पासून ते पुण्यात स्थायिक झाले. तत्पूर्वी कलकत्ता येथील मुक्कामात वंग भाषेशी त्यांचा परिचय झाला. रामानंद चतर्जींच्या 'मॉडर्न रिव्ह्यू' या मासिकात आपटे मराठी पुस्तकांचा परिचय करून देत असत. कलकत्ता येथे 'वंगीय साहित्य परिषद' नावाची संस्था होती. तिचे प्रसारकार्य पाहून आपणही 'मराठी साहित्य परिषद' नावाची एखादी संस्था काढावी असा त्यांच्या मनात विचार घोळू लागला. रामानंद चतर्जी, रवींद्रनाथ ठाकूर यांच्याशी त्यांचा परिचय झाला तो याच काळात. वंग (बांगला) भाषेचे जाणकार म्हणून आपटे यांना लोक ओळखू लागले. बंकीमचंद्र ('वंदेमातरम्' गीताचे जनक) यांचे संपूर्ण साहित्य त्यांनी नंतरच्या काळात चार भागांत मराठीत प्रकाशित केले. १९०६ च्या ग्रंथकार संमेलनात आपटे यांना आपल्या मनातील इच्छा पूर्ण करण्याची चांगली संधी मिळाली.

१९०६ साली पुणे येथे नागनाथ पारानजीकच्या मळेकर वाड्यात २६ आणि २७ मे रोजी चौथे ग्रंथकार संमेलन भरले होते. (चिरेबंद असा दगडी मळेकर वाडा १९६० नंतर










पाडण्यात आला व तिथे नवी इमारत उभी राहिली.) संमेलनास हरिभाऊ आपटे, विसुभाऊ राजवाडे, विजापूरकर, चिंतामणराव वैद्य, ह. भ. प. पांगारकर, काकासाहेब खाडिलकर, वि. ल. भावे, न. चिं. केळकर, रेव्हरंड टिळक, फार काय लो. टिळक इत्यादी शंभर एक साहित्यिक मंडळी उपस्थित होती. अध्यक्षस्थानी गोविंदराव कानिटकर होते. संमेलनाच्या दुसऱ्या दिवशी समारोपाच्या भाषणात केळकरांनी 'आज महाराष्ट्र साहित्य परिषद ही संस्था स्थापन झाली असून तिला ६० सभासद मिळाले आहेत.' अशी घोषणा केली. या घोषणेला लो. टिळकांनी पाठिंबा देणारे भाषण केले आणि सदिच्छा दिल्या. लोकमान्य उपस्थित राहिलेले हे एकमेव संमेलन. परिषदेचे पहिले तीन चिटणीस म्हणून वा. गो. आपटे, वि. ल. भावे आणि काकासाहेब खाडिलकर यांची निवड करण्यात आली.

१९०६ चे संमेलन आटोपल्यावर आपटे, भावे आणि खाडिलकर या तिघा चिटणीसांनी 'केसरी' पत्रात (१० जुलै १९०६) एक विनंतीपत्र प्रसिद्ध केले. त्या पत्रात 'एक रुपया वर्गणी भरून परिषदेचे सभासद व्हा' असे मराठी जनतेला आवाहन करण्यात आले होते. इतकेच नव्हे तर संस्थेचे उद्दिष्टही स्पष्ट करण्यात आले. 'मराठी ग्रंथकारांची व लेखकांची आता वेळोवेळी परिषद भरवून परस्परांमध्ये परिचय वाढविणे व त्यांच्या अडचणी काय आहेत ते समजावून घेऊन त्या दूर करण्याचा प्रयत्न करणे' असे हे उद्दिष्ट होते. या पत्रकात एखादे मासिक व त्रैमासिक काढण्याचा विचारही व्यक्त केला होता.

१९०६ नंतर १९०७ साली पुण्याला विष्णु मोरेश्वर महाजनी यांच्या अध्यक्षतेखाली पाचवे संमेलन भरले. १९०८ साली पुण्यालाच सहावे संमेलन भरले. विजयानंद टॉकीजमध्ये चिंतामणराव वैद्य यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या या संमेलनाचे वैशिष्ट्य म्हणजे स्वागताध्यक्ष वा. गो. आपटे होते. किंबहुना स्वागताध्यक्षपदाची प्रथा याच संमेलनापासून सुरू झाली. वा. गो. यांना ती संधी मिळाली हे योग्यच झाले. पुढले १९०९ मधील सातवे संमेलन बडोदे येथे भरले होते. त्याप्रसंगी आपटे यांनी परिषदेच्या घटनाविषयक नियमांचा जो मसुदा तयार केला होता, त्यावर चर्चा होऊन एक समिती नेमण्यात आली. या समितीचा पक्का मसुदा नंतर १९१२ मधील अकोला संमेलनात (अध्यक्ष हरिभाऊ आपटे) संमत करण्यात आला व साहित्य परिषदेचे पहिले कार्यकारी मंडळ जाहीर करण्यात आले. वि. मो. महाजनी पहिले अध्यक्ष झाले तर 'आनंद' कर्ते वा. गो. आपटे आणि रा. र. मोरमकर (विविधज्ञान विस्तारकर्ते) हे दोघे पहिले चिटणीस झाले. १९१२ सालच्या वसंत व्याख्यानमालेत आपटे यांचे 'साहित्य-परिषद' या विषयावर व्याख्यान झाले होते. या गोष्टीला फार अर्थ आहे. द. वा. पोतदारकृत परिषदेच्या इतिहासग्रंथात (१९४२) प्रस्तुत भाषणाचा गोषवारा छापलेला आहे. विविधज्ञानविस्तारातही ते प्रसिद्ध झाले होते. याचा अर्थच असा की, परिषदेच्या स्थापनेत आणि तिच्या बालसंगोपनात वा. गो. आपटे यांचा मोठा वाटा होता. यानंतर मात्र आपटे परिषदेच्या कामातून हळूहळू निवृत्त झाले. त्यांचे पुढील आयुष्य 'आनंद'

मासिकाचे संवर्धन आणि आनंद छापखान्याचे व्यवस्थापन यात गेले.

१९४९ साली प्रा. श्री. म. माटे परिषदेचे कार्याध्यक्ष असताना त्यांनी 'वा. गो. आपटे इस्टेट ट्रस्ट' कडून दहा हजार रु. ची देणगी गोपीनाथ तळवलकर यांच्या सहकार्याने मिळवली. प्रा. माटे यांनीच उभारलेल्या निबंधमालाकार चिपळूणकर सभागृहात नंतर आपटे यांचे स्मरणार्थ 'वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालया'ची स्थापना करण्यात आली. वाढता वाढता या ग्रंथालयात आज सुमारे चाळीस हजार ग्रंथ आहेत, साठ कपाटे आहेत आणि पंधराशे सभासद-वाचक ग्रंथालयाचा लाभ घेत असतात. ग्रंथालयात आपटे यांचे मोठे छायाचित्र लावलेले आहे.

आणखी गमतीदार योग सांगायचा म्हणजे, 'आनंद' मासिकाचे तीसपस्तीस वर्षे ज्यांनी संगोपन-संपादन केले ते गोपीनाथ तळवलकर हेही १९६१ ते १९६३ या काळात साहित्यपरिषदेचे एक उत्साही चिटणीस होते. परिषदेच्या 'माधवराव पटवर्धन सभागृहा'त त्यांची अनेकदा व्याख्याने झाली आहेत. २९ नोव्हेंबरला पटवर्धनांचा स्मृतिदिन असतो, तर २९ नोव्हेंबर हा तळवलकरांचा जन्मदिन आहे. त्यामुळे पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन (कवी) यांना तळवलकर गुरुस्थानी मानीत असत. तळवलकर 'नाना' या नावाने सर्वांना परिचित होते. पायघोळ धोतर, अंगात पांढराशुभ्र नेहरूशर्ट, त्यावर जाकीट, डोळ्यांवर चष्मा, डोक्यावर गांधी टोपी आणि सदैव शोधक अशी हसरी मुद्रा या वेषात ते वावरत असत. 'आनंद' चे संपादक गोपीनाथ सदैव आनंदी, प्रसन्न असत.

❑

---

## साभार पोच

**दहशतींच्या छायेत – डायरी काश्मिरी अनामिकांची :** अनुवाद– सुजाता देशमुख, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ १८६

**माझी गाणी :** वैशाली बा. नायकवडे, मातृभूमी प्रकाशन, पुणे, पृष्ठ २८

**एका पावलाचा प्रवास :** सुरेश आकोटकर, कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ १८०

**राघवाचा धर्म गाजो :** वामन गोगटे, गोदावरी प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ १००

**झलक : अमेरिकन जीवनाची :** अरविंद नीलकंठ नवरे, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, पृष्ठ १००

**माळ :** घावा भावांची, स. वि. हसबनीस, बत्तीस शिराळा, अमेय प्रकाशन, पृष्ठ १८०

**दीपशिखा :** स. वि. हसबनीस, बत्तीस शिराळा, अमेय प्रकाशन, पृष्ठ ५६

**मन माऊली :** स. वि. हसबनीस, बत्तीस शिराळा, अमेय प्रकाशन, पृष्ठ ९६

**त्रिदल :** मधुकर सदाशिव वाघमारे, हरिवंश प्रकाशन, नागपूर, पृष्ठ १००

**निर्बुद्धीचा राज्यकारभार :** अनुवाद– मृणालिनी कामत, साहित्य अकादमी, मुंबई, पृष्ठ १०८

**आपण जे पाहतो :** अनुवाद– वलवंत जेऊरकर, साहित्य अकादमी, मुंबई, पृष्ठ ६६

**मराठी दलित कविता :** संपा. बी. रंगराव, साहित्य अकादमी, मुंबई, पृष्ठ १३४



अनुक्रमणिका






# चरित्र-समीक्षक डॉ. द. न. गोखले



**जयंत वष्ट**

स्वातंत्र्योत्तर काळातील आपल्या दर्जेदार, वैशिष्ट्यपूर्ण चरित्रग्रंथांमुळे आणि व्यक्तिविमर्शामुळे चरित्रवाङ्मयाच्या अभ्यासकांना परिचित असणारे डॉ. द. न. गोखले यांनी चरित्राची समीक्षा या स्वरूपाचे फारसे लेखन केलेले नाही. पण त्यांच्या 'चरित्र-चिंतन' या एकमेव चरित्र समीक्षा संग्रहातून १९७० ते १९९७ या सत्तावीस वर्षांच्या दीर्घ कालखंडातला गोखले यांच्या समीक्षा विचारांचा आलेख त्यांच्या नजरेसमोर येतो. एखादा चरित्रग्रंथ वा एखादे आत्मचरित्र आवडल्यास त्याविषयी ते लिहिताना दिसतात आणि असे समीक्षालेख जेव्हा त्यांनी 'चरित्रचिंतना'चा विचार केला तेव्हा केवळ आठ होते असे ते म्हणतात. त्यात एक त्यांच्या ग्रंथाची प्रस्तावना त्यांनी गृहीत धरली आहे (डॉ. केतकर आणि शीलवतीबाई), तर 'चरित्रकार आणि आत्मचरित्रकार केळकर' हा दीर्घ लेख केळकर शताब्दी ग्रंथातला आहे, तेथे केळकरांचे मूल्यमापन आहे. तो केवळ समीक्षापर नाही. १९९५ पासून ते साधारणत: दोन-अडीच वर्षांच्या काळपर्यंत त्यांनी सहा लेख नव्याने लिहिले आहेत.

साधारणत: या उपलब्ध समीक्षालेखांकडे पाहता असे दिसते की, एखाद्या ग्रंथाचे जे जे आवडले, समीक्षादृष्टीने पटले, की त्याचा गुणात्मक उल्लेख करण्यास गोखले विसरत नाहीत. ते मनापासून त्या त्या चरित्रकाराचा/आत्मचरित्रकाराचा गुण सांगतात. त्यांच्या स्वत:च्या त्या विषयीच्या कल्पना ते स्पष्ट करतात व ज्या गोष्टी पटणार नाहीत त्याही ते साधार मांडतात. मग तेथे त्या लेखकाची न पटणारी गोष्ट ते स्पष्टपणे नाकारताना दिसतात. चरित्राची समीक्षा आणि आत्मचरित्राची समीक्षा यांतलं साम्यभेद तसेच इतर वाङ्मयप्रकारांच्या समीक्षांहून असणारे या समीक्षेचे वेगळेपण ते जाणतात. आपल्या चरित्रग्रंथांच्या वाचकांप्रमाणेच आपल्या समीक्षेच्या वाचकांची चाणाक्षता ते ओळखून आहेत. चरित्रकाराच्या वा आत्मचरित्रकाराच्या उणिवांचा विचार करताना ते त्या त्या लेखकाची अपरिहार्यताही लक्षात घेताना दिसतात. गोखल्यांची समीक्षादृष्टी लक्षात घेण्याजोगी व नव्या चरित्र/आत्मचरित्र-समीक्षकांच्या दृष्टीने अभ्यसनीय असल्याने त्या संदर्भात या समीक्षालेखांचे आकलन येथे

नोंदण्याचा प्रयत्न आहे.

तत्कालीन धोपटमार्गी चरित्रलेखनपद्धती नाकारून, चरित्रनायकाचा जीवनक्रम आणि व्यक्तित्व या दोन गोष्टी मुख्य मानून त्यांचे स्वयंपूर्ण चित्रण करण्याच्या ध्येयाने, अपरिहार्य तेवढीच माहिती देत देत 'गॅरिबाल्डी' चरित्र १९०१ मध्ये लिहिणारे केळकर यांना गोखले यांनी गौरविले आहेत; कारण केळकर आपल्या चरित्रग्रंथात मिळेल तेवढी माहिती ठासून, कोंबण्याची पूर्वापार पद्धत स्वीकारत नाहीत म्हणून. पण नंतर बावीस वर्षांनी लिहिलेल्या टिळक चरित्राचा विचार करताना केळकर पुन्हा धोपटमार्गी होतात, हे मात्र त्यांनी साधार मांडले आहे. पहिल्या खंडात टिळकांविषयी 'प्रकरणांप्रमाणे' माहिती देणारे केळकरांचे टिळकचरित्र जरी मनोवेधक असले तरी नंतरच्या दोन्ही खंडांचे लेखन हे तुटकपणाचे, तसेच बऱ्याचदा विस्ताराचे आणि निस्कळीतपणाचे 'होल्डॉलवजा' झाल्याचे गोखले यांनी स्पष्टपणे उदाहरणांसह टिपले आहे.

चरित्रातील घटना-प्रसंग वा व्यक्तींसंदर्भात 'सरधोपट समभाव' गोखले यांना आढळतो. येथे विषयाची अतिव्याप्ती असल्याने टिळक चरित्राचा टिळकयुगीन चरित्रकोश होतो. प्रा. फाटक यांनी केळकरांच्या 'टिळकचरित्रातील चुकांचा पाढा' वाचल्याचे गोखले यांनी सांगितले आहे. त्याचबरोबर तत्त्वशोधक बुद्धिमत्ता असणारे सहृदय केळकर टिळकांच्या सान्निध्यात, त्यांच्या व्यक्तिगत व सार्वजनिक स्नेहबंधात व कार्यात, जवळजवळ पंचवीस वर्षे सहकारी म्हणून होते. त्यामुळे टिळकचरित्र चिंतनप्रक्रिया कित्येक वर्षे मनात होतीच. तेव्हा असा चरित्रकार लाभणे हे या चरित्राचे बलस्थान असल्याचेही गोखले सांगतात. त्यांच्या लेखनाला साक्षात निरीक्षणाचा, प्रत्यक्षानुभवाचा ताजेपणा आणि लेखनशैलीतील, निवेदनातील वाचनीय, चटकदार व सुबोध मांडणीची हातोटी होती, हे गोखले यांनी आवर्जून उल्लेखिले आहे.

टिळक-चरित्र असो वा 'गतगोष्टी' वजा आत्मचरित्र असो, नेटक्या मांडणीकडे केळकरांचे लक्ष नसल्याचे गोखले यांना आढळले आहे. लेखनविषयाची मर्यादा सांभाळता न आल्याने त्यात अघळपघळपणा, धरसोडवृत्ती, आकृतिविहीनता आल्याचेही स्पष्ट होते. 'गतगोष्टी'त हे प्रमाण थोडे कमी आहे इतकेच; पण केळकर चरित्राप्रमाणेच आत्मचरित्राची चौकटही पाळताना दिसत नाहीत. काही गोष्टी केळकरांना चरित्रकार म्हणून साधल्या आहेत तर आत्मचरित्रकार म्हणून साधल्या नाहीत, अशा पद्धतीने गोखले केळकरांना तपासताना दिसतात. टिळक-चरित्रकार केळकर वा 'गतगोष्टी'तून डोकावणारे आत्मचरित्रकार केळकर यांना गोखले थोर कलावंत म्हणून निखळ मान्यता देऊ शकत नाहीत. विषयव्याप्तीत संयम न राखणे, मांडणीत कौशल्याचा अभाव, गौण-प्राधान्य वा निवडीविषयीची उदासीनता, विषमतेचा व पाल्हाळाचा दोष असणारी निवेदनशैली ही त्याबाबतची काही कारणे सांगून गोखले यांनी केळकरांच्या काही गुणांचा उल्लेखही केला आहे. त्यांच्यातली व्यापक सहृदयता, तत्त्वजिज्ञासू बुद्धी ही










चरित्रकाराच्या कलेला पोषक होती. काही दोष असले तरी निवेदनशैलीत अनेक साहित्यगुण होते; व्यक्तींची चित्रे रंगवण्याचे कसब उत्तम होते. या साऱ्यातून केळकर हे 'थोर' नसले तरी चांगल्यापैकी कलावंत असल्याचे मान्य करत असतानाच 'आपण कलावंत असल्याचा दावा चरित्राच्या व आत्मचरित्राच्या संदर्भात केळकरांनी केलेला ऐकिवात नसल्याचे' ते मुद्दाम सांगताना दिसतात. याचे कारणही नोंदविताना ते म्हणतात की, "केळकरांनी या वाङ्मयप्रकारात जे लेखन केले तेही कलावंताच्या भूमिकेवरून केले नाही, तर जाणूनबुजून अन्य भूमिकेवरून केले... त्यांची भूमिका साहित्यिकाची नव्हती. त्यांनी घेतलेली भूमिका इतिहासकाराची किंवा बखरकाराची होती." (पृ. ५१)

केळकरांना इतिहासकाराच्या साक्षेपाऐवजी अवांतर चटकदार हकीगती व चुटके सांगण्याचा मोह होता, इतिहासकाराला आवश्यक ती तपशिलावरची पकड नव्हती आणि साधनसामग्री भरपूर प्रमाणात हाताशी असूनही त्यांचे वळण मात्र बखरकाराचे होते, टिळकांचे व स्वत:चे जीवन त्यांनी डोळसपणे बघितले होते. पण जेव्हा ते लिहावयास बसले तेव्हा इतिहासकार व कलावंतांच्या जुगलबंदीत अडकले. शिवाय ते मूलत: आणि मुख्यत: पत्रकार असल्याने गोखले म्हणतात, "पाऊण कलाकार, अर्धाअधिक इतिहासकार नि पुरा पत्रकार यांची ही जुगलबंदी कशी रंगली? रंगायची तशीच रंगली! ही असली जुगलबंदी म्हणजेच 'चरित्रकार व आत्मचरित्रकार केळकर'– दुसरे काही नाही!" (पृ. ५१)

केळकरांच्या मूल्यमापनाची गोखल्यांची समीक्षापद्धत कसदार व वाचकांनाही समाधान देणारी आहे. त्यांचे चरित्रग्रंथांवरील लेखनही असेच दर्जेदार आहे. हे या संग्रहातील सात चरित्रांच्या समीक्षेतून जाणवते. गोखले यांनी हाताळलेले चरित्रकारही लक्षणीय आहेत. आयुष्य चरित्रलेखनासाठी वेचणारे खानोलकर, कीर तसेच ऐतिहासिकदृष्टीने मीमांसा करणारे फाटक जसे येथे आहेत तसेच स. रा. गाडगीळ, भा. दि. फडके, पद्मजा फाटक यांच्यावरोबर एमिल लुड्‌विगही आहे. हे चरित्रकार गोखल्यांनी त्यांच्या पद्धतीने अभ्यासले आहेत आणि ते अभ्यासण्यामागे चरित्रकार गोखले यांची भूमिकाही लक्षात घेण्यासारखी आहे. फाटकांचे 'रानडेचरित्र', खानोलकरांचे 'कोल्हटकर चरित्र', आणि कीरांचे 'महात्मा गांधीचरित्र' ही तिन्ही चरित्रे गोखल्यांना ह्या चरित्रकारांची भूमिका समजून घेण्यासाठी उपयोगी पडली असावीत आणि फडके यांचे आंबेडकर चरित्र त्यांनी 'एक न साधलेले चरित्र' म्हणून पाहिल्याचे दिसते. शिक्षणक्षेत्रातील 'ताराबाई मोडक' बहुधा त्यांना परिचित असल्याने ते पद्मजाताईंनी लिहिलेल्या चरित्राकडे वळले असावेत आणि स. रा. गाडगीळ त्यांचे परिचित व नेहरूंचे 'चिकित्सक वैचारिक चरित्र' त्यांनी लिहिल्याने गोखले या चरित्राकडे आकृष्ट झाले असावेत. हे सारे कयास आहेत. मात्र 'नेपोलियन'वरचे प्रेम त्यांना लुड्‌विगकडे घेऊन गेले आणि ते त्याच्या प्रेमात पडले ही मात्र वस्तुस्थिती आहे. या चरित्रांची समीक्षा अभ्यासताना हे कयास कसे टिकतात हे आता पाहू.



अनुक्रमणिका

श्रीपाद कृष्णांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने त्यांचे शिष्य गं. दे. खानोलकर यांनी 'साहित्यसिंह' या नावाचे त्यांचे चरित्र १९७२ मध्ये लिहिले. या निमित्ताने खानोलकरांच्या चरित्रकलेचा शोध गोखले यांनी घेतला आहे. त्यांचा या कलेविषयीचा, चरित्रतंत्राचा अभ्यास लक्षात घेऊन गोखले यांनी त्यांच्या 'स्व-तंत्राचा' उल्लेख केला आहे. चरित्रनायक आणि संबंधितांची व्यक्तिरेखा आपल्या समृद्ध कथनाच्या रीतीने खानोलकर सजीव करतात हे सांगतानाच त्यांची बाळबोध सरळ व साधी, पण प्रत्ययकारी भाषा प्रसंगी काव्यमय तर कधी लवचिक कशी होते, हेही ते दाखवितात. चरित्रनायकाच्या आठवणींचा अचूक उपयोग व्यक्तिमत्त्वाच्या आकलनासाठी करणारे खानोलकर उताऱ्यांचा उपयुक्त वापर करताना काही वेळा पुनरुक्ती करतात. पण त्यांची दृष्टी सत्यशोधकाची व सत्यदर्शनासाठीची आहे हे सांगताना गोखले यांनी खानोलकरांच्या मर्यादाही दाखवल्या आहेत. काही वेळा ते लेखनातील रटाळपणा टाळू शकत नाहीत असे दिसते. पण ऐतिहासिक-ललितचरित्राच्या लेखनाची तारेवरची अवघड कसरत, सत्य-सौंदर्य तत्त्वांचा वेध घेत खानोलकर सांभाळतात असेच गोखले यांना वाटते.

प्रा. न. र. फाटक यांच्या रानडेचरित्राचे स्वरूप सांगताना प्रारंभीच डॉ. गोखले फाटक यांच्या चौफेर सूक्ष्म व्यासंगाला पावती देतात. पण या व्यासंगाला आधारांची, संदर्भांची जोड नसल्याने पुढील संशोधकांच्या प्रगतीच्या वाटा ते पुसून टाकतात, हेही लगेचच सांगतात. त्यांचे लक्ष 'रानडे' यांच्या व्यक्तित्वावरच केंद्रित झाले आहे. त्यात बुद्धीची व्यापकता-सूक्ष्मता व विविधता दिसते पण व्यक्तित्वास जिवंतपणा मात्र येत नाही. संधी सापडो न सापडो, प्रतिपक्षावर हल्ले करून त्याला चावे घेण्याची 'फाटक' वृत्ती मात्र दिसते. रानडेचरित्र हे ऐतिहासिक, वैचारिक चरित्र असले तरी ते मुख्यत: ऐतिहासिक व गौणत: वैचारिक कसे आहे, ते गोखले यांनी दाखवले आहे. त्यास ललित साहित्यरूप फारसे लाभलेले नाही. कारण तेथे फाटकांचे कोरडे, बौद्धिक व्यासंगी, बहुश्रुत व्यक्तित्व आडवे येते व त्यांच्याकडे नसलेली रसलुब्धता, भावनाप्रवणता व रसिक प्रतिभा वाचकांना जाणवते. वाचकांना हेही जाणवते की फाटकांना भाषा-विशेषत: ललित भाषा साथ देत नाही. हे चरित्र उत्कृष्ट वैचारिक चरित्र न होण्यामागची कारणे आपल्या पद्धतीने सांगत गोखले त्यास उत्कृष्ट ऐतिहासिक चरित्र म्हणून गौरवतात.

कीरांच्या 'म. गांधी' चरित्रातील एक उणीव दाखवावयासाठी लिहिताना प्रारंभी चरित्राची तीन अंगे सांगून त्याकडे कीरांमधला संशोधक जाणीवपूर्वक लक्ष देताना दिसत असल्याचे गोखले स्पष्ट करतात; आपल्या चरित्रग्रंथात भारुडभरती न करता, व्यासंगपूर्वक आणि व्यवस्थित साधार लिहिणारा अष्टावधानी चरित्रकार म्हणून त्यांचा आदर करतात. चरित्राची घट्ट वीण आणि अपवाद वजा जाता सुव्यवस्थित मांडणी हे 'म. गांधी'चे बलस्थान असल्याचे ते सांगतात. व्यासंगाची पराकाष्ठा करून आणि शक्य तेवढी तटस्थता बाळगूनही अभ्यासान्ती जाणवणारे

गांधीजींविषयीचे त्यांचे विरोधी मत गोखले लक्षात घेतात. 'व्यक्तित्वा'पेक्षा कीर 'जीवनक्रमा'स प्राधान्य देतात हेही त्यांच्या लक्षात आले आहे. व्यक्तित्वाची सर्व लक्षणीय अंगोपांगे त्यांच्या त्यांच्या सापेक्षमहत्त्वानुसार चरित्रात जशी प्रकट व्हावयास हवी तशी होत नाहीत; त्यात कीर कमी पडतात असे गोखले यांना वाटते आहे; कारण कीरांनी व्यक्तित्व मध्यवर्ती लेखून चरित्र मांडलेले नाही. गांधींचा व्यक्तित्वातील 'धर्मभावना' या अंगाविषयी उदाहरणादाखल गोखले चर्चाही करताना दिसतात. तसाच विचार त्यांचा राजकारणाचा व सत्याग्रहाचा संबंध ध्यानी घेऊनही व्हावयास हवा होता असे म्हणता म्हणता गांधीजींची धार्मिकता कीरांनी बलपूर्वक आणि विस्ताराने मांडलेली नाही हे सांगून गोखले म्हणतात की "गांधींच्या आत्मप्रस्थापना, संघटनाकौशल्य, ध्येयनिष्ठा, आत्मविश्वास, संन्यास आणि आत्मवंचक उपभोग, श्रद्धा आणि एककल्लीपणा या व्यक्तित्वघटकांसह पूर्ण व्यक्तित्वाभोवती कीर आपला चरित्रग्रंथ गुंफू शकलेले नाहीत. ते गांधीजींचे पूर्ण व्यक्तित्व बघत नाहीत." ही गोखले यांना कीरांच्या गांधीचरित्रामधली उणीव जाणवते. डॉ. स. रा. गाडगीळ यांचे 'पं. नेहरूचरित्र' एक शुद्ध, व्यासंगपूर्ण, विनम्र पण स्पष्ट वैचारिकचरित्र असल्याने गोखले या चरित्राकडे आकर्षिले गेल्याचे त्यांच्या लेखनातून दिसते. प्रौढ काळातील केवळ राजकीय विचारांच्या अनुरोधाने घेतलेला व्यक्तिशोध असेच याचे रूप त्यांना भावले आहे. एका व्यक्तीच्या राजकीय विचारांचे हे चरित्र असून त्यात त्या विचारांची सूत्रसंगती व मूल्यमापन सामावले असल्याचे गोखले यांनी लक्षात घेतलेले आहे. नेहरूंच्या वैचारिकतेतील गुणदोषांचे चिकित्सक मूल्यमापन करण्यात डॉ. गाडगीळ यशस्वी झाल्याचे गोखले यांचे विवेचन येथे दिसते.

पूर्णाकृती ललितचरित्रासाठी विशेष गुणधर्मांनी संपन्न जीवन निवडल्याबद्दल पद्मजा फाटक यांचे अभिनंदन करून डॉ. गोखले 'ताराबाई मोडक' यांच्या चरित्राविषयी लिहितात, 'प्रतिकूल परिस्थितीशी झगडणारे ताराबाईंचे कर्तृत्व भविष्याची स्वप्ने रंगवत, आशा-निराशेचे झोके खात, नवी वाट मळत, भावनांच्या अनुभवातून विकास पावता पावता शेवटी यशस्वी होऊन चरित्रविषय कसे होते' याचा आलेख या पुस्तकातून गोखले अनुभवतात. केंद्रभूत व्यक्तित्वातील विकसनशीलता तसेच त्या व्यक्तित्वाची कर्तबगारी व मनाची प्रगल्भता गोखले यांना लक्षणीय वाटते. हे चरित्र विचारांची उंची गाठणारे आहे हेही ते स्पष्ट करतात. मात्र मनोवैज्ञानिक कल्पकतेच्या साहाय्याने लेखिकेने डोळसपणे अमूर्ताचा पाठलाग केला नसल्याने या उत्तम चरित्रास थोडेसे उणिवेचे गालबोट लागल्याचे त्यांना वाटते.

ऐतिहासिक सत्याला बाध न आणता अधिक सूक्ष्म आणि खोल करणारे मनोवैज्ञानिक सत्यचरित्र चरित्रात अवश्य यावे. त्याने चरित्र अधिक सजीव व स्वयंपूर्ण करावे; मात्र ते सत्याला तिळमात्रही दुखवणारे नसावे याचा अनुभव गोखले एमिल लुड्‌विग याच्या नेपोलिअन चरित्रातून घेतात असे दिसते. 'नेपोलिअन'च्या जीवनात प्रचंड धामधूम व प्रचंड योगायोग होता; थक्क व्हावे असे सुदैव-दुर्दैवाचे दशावतार तेथे होते. त्यामुळे हा

चरित्रनायकच चरित्राचे निम्मे यश निश्चित करतो आणि आपल्या इतिहासाच्या जाणकारीतून आलेल्या साहित्यिक चरित्रकाराच्या दृष्टीतून लुड्‌विग नेपोलियनचे गुंतागुंतीचे, विरोधाभासाचे, आणि विलक्षण असे व्यक्तित्व साकारतो. आकर्षक म्हणजे वेधक, आस्वाद्य, रंजक आणि मनमोहक व्यक्तित्व हे अनुकरणीय, आदरणीय, पूज्य वा वंदनीय असेलच असे नाही हे या निमित्ताने सांगून गोखले यांनी नेपोलियनचे व्यक्तित्व थोर, अनन्य, थक्क करणारे, प्रचंड, गहन आणि जटिल असल्याचे म्हटले आहे. इतिहासातील घटना आणि उल्लेखांना धक्का न लावता, मनोवैज्ञानिक कल्पकता खुबीने मिसळून या चरित्र-कलाकृतीत लेखक एकात्मताही साधतो. सत्याला आवश्यक आधार, टीपा इत्यादी न देता आणि तरीही इतिहासाला न सोडता वाङ्मयीन सौंदर्य साधणारे हे चरित्रलेखन आहे.

चरित्रांविषयी लिहिताना त्यातील गुणावगुणांची वाङ्मयीन समीक्षा करणारे गोखले जेव्हा चरित्रकाराने चरित्रनायकाच्या संभाव्य उत्तम चरित्राचा-एका सुंदर विषयाचा-पार चुथडा केला आहे असे जेव्हा ठासून सांगतात तेव्हा हे विधान वाचकांना विचार करावयास लावणारे ठरते. डॉ. भा. दि. फडकेलिखित डॉ. आंबेडकर चरित्राविषयीचे गोखले यांचे वरील विधान त्यांनी सर्व दृष्टींनी आधार देत देत सिद्ध झालेले आहे. 'गुण पाहाता जवापाडे दोष पर्वताएवढे' ही स्थिती त्यांना येथे सांगायची आहे. ''त्याची निकृष्टता कळावी यासाठी तरी हे चरित्र मुळातून वाचावे'' हे गोखल्यांचे स्पष्टोद्‌गार वाचनांती पटतात. चरित्रातील आशय आणि मांडणी अस्ताव्यस्त व बेशिस्त आहे, तसेच चरित्रकाराचा भर कार्यावर आहे की विचारांवर हे कळत नाही; अशा आरोपांनीच गोखले यांची समीक्षा सुरू होते. चरित्र व्यस्त आणि विषयहीन होण्यामागची कारणे येथे ते देतात. आंबेडकर चळवळीत राहूनही आंबेडकर कोणत्याही अर्थाने समजून घेण्यात फडके पार अयशस्वी झाल्याचा गोखले यांचा येथे रोख आहे. केवळ वाङ्मयीन समीक्षा करून गोखले थांबत नाहीत तर या ग्रंथाची ते भाषिक समीक्षा देखील करतात. ती करताना गोखले स्पष्ट करतात की, ''या पुस्तकातील भाषादोषांचे विविधत्व, विपुलत्व नि गांभीर्य लक्षात घेता असे वाटते की भारदस्त नि प्रौढ मराठी-वाङ्मयात अलीकडच्या दहा-पंधरा वर्षांत असे दुसरे पुस्तक निपजले नसावे. मराठीला लाभलेला हा अनन्वय अलंकार असावा.'' (पृ. १०२)

यानंतर गोखले यांनी केलेल्या आत्मचरित्रपर समीक्षेकडे पाहता हे दिसते की, त्यांनी 'एक झाड : दोन पक्षी' (विश्राम बेडेकर), 'आहे मनोहर तरी' (सुनीता देशपांडे) आणि 'स्मरणगाथा' (गो. नी. दांडेकर) या तीनच आत्मचरित्रांवर लिहिले आहे. त्यातही केवळ एकच 'एक झाड : दोन पक्षी' पूर्वप्रसिद्ध असून बाकीची दोन या ग्रंथाच्या निमित्ताने लिहिली आहेत. ही तिन्ही पुस्तके त्यांना मनापासून आवडली आहेत आणि तरीही त्यातील गुणांच्या कौतुकाबरोबर दोषदिग्दर्शनही ते करताना दिसतात.

मन वेधून टाकणारी गो. नी. दांडेकरांची 'स्मरणगाथा' वाचल्यावर तिचे यश कशात

आहे, याचा शोध घेताना गोखले यांना या आत्मचरित्रातील तीन गुणांचे अस्तित्व लक्षात येते. वयाच्या बारा-तेराव्या वर्षापासून ते संघ-प्रचारक होईपर्यंतच्या दांडेकरांचा विलक्षण आयुष्यक्रम, त्याच्या निवेदनाचा विस्मयकारक वेग आणि प्रत्ययकारी वर्णन यामुळे यशस्वी ठरलेल्या या स्मरणगाथेला विचारांच्या थिटेपणाची असणारी मर्यादाही गोखले स्पष्टपणे दाखवतात. दांडेकरांच्या मनातला 'एक वैनतेय' आणि 'एक कुक्कुट' गोखले यांना दिसतो व म्हणूनच ते एकीकडे उंच भराऱ्या घेऊ शकतानाच दुसरीकडे भुईवरून दहा हात उडू शकत नाहीत याचे विश्लेषण गोखले करतात. प्रचंड पण पांगळे असे दांडेकरांचे व्यक्तित्व 'स्मरणगाथे'त प्रतिबिंबित झाल्याचे गोखले पाहतात.

आपण जसे आठवेल तसे सांगणार आहोत, अशा आविर्भावात लेखनाला प्रारंभ करणाऱ्या व स्वत:भोवती ते लेखन सतत फिरत ठेवणाऱ्या सुनीताबाईंच्या 'आहे मनोहर तरी' मधून खऱ्या कलाकृतीमधला-आत्मचरित्रामधला-गोळीबंदपणा गोखले टिपताना दिसतात. स्वाभाविक सहजता लाभलेल्या या कलाकृतीच्या रचनाकौशल्याला अपवादात्मक प्रसंगी तडा जात असला तरी त्यातील भाषाविष्कारातून प्रकटणाऱ्या आशयाची आस्वाद्यमानता लक्षणीय आहे. इतके लोभस आणि झळाळणारी अंगे लाभलेल्या या सुनीताबाईंच्या व्यक्तित्वातील बाणेदारपणा व स्फोटकपणा गोखल्यांना मध्यवर्ती अंग म्हणून जाणवतो. त्यांची विचारशीलता गोखले यांना विशेष भावल्याची दिसते. गोखले पुढे म्हणतात की "सुनीताबाईना कलाकृतीच्या एकरूपतेसंबंधी जसे नैसर्गिक भान आहे तसेच माणसाचे वैशिष्ट्य हेरण्याचे नि त्याचे व्यक्तिचित्र रेखाटण्याचे नैसर्गिक कौशल्य आहे." (पृ.१०६) मर्यादित फटकाऱ्यात उभी ठाकणारी या आत्मचरित्रातील व्यक्तित्वे सारे वातावरण जिवंत झाल्याची जाणीव वाचकांना देतात. यातील सर्वांत महत्त्वाच्या पु.लं.च्या व्यक्तित्वाचे सुनीताबाईंनी रेखाटलेले चित्र गोखले यांनी ठळकपणे वाचकांसमोर उभे केले आहे. गोखले यांच्या मते या आत्मचरित्रातील सुनीताबाईंचा 'मी' आस्वाद्यमान, रोचक, आकर्षक असला तरी तो प्रिय, हवाहवासा, अनुकरणीय नसल्याचे दिसते. सुनीताबाईंच्या स्वभावातला टणकपणा, कठोरपणा याचा वचक जाणवतो, त्यामुळे त्या प्रिय वाटत नाहीत असा सूर जेव्हा गोखले लावतात तेव्हा सुनीताबाईंच्या या 'आहे मनोहर तरी' मधल्या स्वभावातला–पारंस्थितीतला नव्हे-असंतोष गोखले यांना खटकतो आहे हे लक्षात येते आणि "हे 'स्त्रीरत्न' सांभाळण्यासाठी 'पुरुषोत्तमच' हवा" असे ते का म्हणतात तेही वाचकांना पटते.

विश्राम बेडेकरांचे 'एक झाड : दोन पक्षी' गोखले यांना खरोखरच भावल्याचे वाचकांच्याही लक्षात येते. हे या संग्रहातील जरासे उजवे आत्मचरित्र-समीक्षण. कारण तेथे गोखले यांच्या काही आत्मचरित्रविषयक चिंतनाचीही कल्पना वाचकांना येते. चरित्र आणि आत्मचरित्र हे वाङ्मयप्रकार इतिहास आणि साहित्य या दोहोंनी सामायिकात व्यापलेल्या प्रदेशात वास्तव्याला असतात (पृ.८८). हे लक्षात घेऊन गोखले या वाङ्मयप्रकारातील सृष्टी वास्तव आणि मानवी व्यक्तींनी व्यापलेली असल्याचे सांगतात. या सृष्टीला सजीव

आणि समृद्ध करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या विश्लेषण, संश्लेषण आदि प्रक्रियांविषयीची चर्चा येथे येते. यासाठीची गोखले यांना स्वत:ला आवश्यक वाटणारी सारी प्रक्रिया बेडेकरांना सहज साधल्याचे ते सांगतात. आशयाने अभिव्यक्तीचा घाट ठरावा ही, गोखले यांच्या मनातील कलाविषयक अपेक्षाही त्यांना बेडेकर पुरी करताना दिसतात. मुंडकोपनिषदातल्या मंत्रानुसार जीवनवृक्षावर असणाऱ्या दोन पक्ष्यांपैकी एक जीवन जगतो, भोगतो व सोसतो आणि दुसरा बघ्याची भूमिका घेऊन चिंतन करत राहतो. या दुसऱ्या पक्ष्याची भूमिका घेऊन बेडेकर लिहितात. गोखले यांच्या मते उत्तम आत्मचरित्रकाराला आवश्यक असणारी वेधक जीवनाची देणगी बेडेकरांना भरपूर लाभली आहे. जीवन वेधक आणि चित्ताकर्षक व्हावे, अशा अनेकविध गोष्टी बेडेकरांनी अनुभवल्या आहेत.

यातून व्यक्त होणारा आशय बेडेकर स्वत:च्या अंतर्जीवनाभोवती फिरवत ठेवतात; त्यामुळे गोखले यांच्या मते आत्मचरित्रास गहिरी एकरूपता लाभते, ते कोठेही पसरट, पाणचट वा पोचट झालेले नाही (पृ. ८३). यात 'आपल्या दुसऱ्या पत्नीविषयीचे चित्र फार अपुरे, तुटके आणि धावते आहे. आशयसूत्रात ते बसत नाही'; हे समर्थनही न पटणारे आहे. पण या त्रुटीबाबत गोखले बेडेकरांना दोष देत नाहीत. आत्मचरित्रकाराने जीवनाच्या कोणत्या भागावर किती प्रकाश टाकावा, हे त्याचे स्वातंत्र्य आहे, असे म्हणून व्यावहारिक जीवन जगण्यासाठी व वैयक्तिक जीवनात कलह निर्माण न व्हावा म्हणून त्यांनी स्वत:च्या सांसारिक जीवनाला आवृत ठेवले असेल तर ते गोखले स्वीकारतात. सत्यदर्शनाच्या प्रेरणेतून आपले दर्शनीरूप कसे आहे, ते बेडेकर सांगतात. याविषयी येणारी समीक्षकांची एकांगी मते गोखले साधार निरस्त करतात. त्यासाठी ते या आत्मचरित्रातील प्रखर आत्मशोधाचे स्वरूपवर्णन करतात. गुणदोषात्मक विवेचनाच्या निमित्ताने 'आत्मसमर्थन' आणि 'आत्मनिर्भर्त्सना' या संकल्पनाही ते वाचकांपर्यंत पोहोचवतात. बेडेकर इतिहासाशी इमान राखतात. कल्पिताच्या साहाय्याने आत्मचरित्रात्मक कादंबरी करत नाहीत. या साऱ्यामुळे यात आपण वाचक कुठूनही, कोणत्याही आशयखंडाच्याद्वारे प्रवेश करून थेट आत्मचरित्रकाराच्या हृदयाप्रत पोहोचू शकतो. हे आत्मचरित्र आजवरच्या परंपरांपलीकडे जाते. या विवेचनातून गोखले अत्युत्कृष्ट आत्मचरित्राची संकल्पना स्पष्ट मांडतात.

आपल्या मर्यादित पण विश्लेषण चरित्रग्रंथसमीक्षेच्या आधारे या मुळातच अल्प प्रमाणात होणाऱ्या दर्जेदार समीक्षेत गोखले यांनी स्वत:चे स्थान निर्माण केले आहे. चरित्र-आत्मचरित्राच्या समीक्षकाच्या ज्ञानाविषयी आणि वृत्तीविषयी तसेच या प्रकारच्या टीकेविषयींची आपली निरीक्षणे आणि मते येथे गोखले स्पष्टपणे साधार नोंदवतात. आत्माविष्कार फसवा कसा असतो, हे गोखले जाणतात. तो तसा का नसावा हे सांगता सांगता, फसवा आत्माविष्कार चाणाक्ष वाचकांना निश्चित समजतो हे त्यांनी उदाहरणासह या समीक्षाग्रंथात उल्लेखिले आणि चरित्र-आत्मचरित्राविषयीचे आपले चिंतनही या समीक्षेद्वारे उत्तमरीतीने अभ्यासकांसमोर विचारार्थ ठेवले आहे.

❏

# वसंत आबाजी डहाके यांच्या कादंबरिकांविषयी...



प्रा. एम. पी. पाटील

१) डहाके यांची 'प्रतिबद्ध' नावाची एक छोटी कादंबरिका आहे. तिचा नायक विनायक हा Outsider च. त्याला वाटते, या भोवतालच्या परिसरात आपण एकाकी आहोत, त्याला पडणारे एक स्वप्न असे– 'आपलं नावगाव सर्वच हरवून गेले आहे. बाँबवर्षाव, ओसाड उद्ध्वस्त जमीन, झाड नाही, गवत नाही. भाजून निघाली सारी जमीन.

आणि जिच्या डोळ्यांसमोर सदैव स्वप्नातली फुलं तो धरू शकत नाही, त्या आशूला तो जीवाच्या आकांतानं शोधतोय. आशूला वाचवलं पाहिजे... त्याची धडपड.'

–ही आशू म्हणजे Outsider च्या नेणिवेतील सृजनदेवताच का? ....आणखी एक–

तो म्हणतो, 'माणूस असतोच. स्वत:च्या मुक्तीची धडपड करीत राहतो. वादळानं तुटलेल्या झाडांप्रमाणं पुन्हा पल्लवित होतो.'

कुठून येतं हे बळ?

हे आध्यात्मिक वगैर नसणार

हा निसर्गच.

–म्हणजे झाडेपानेफुले, माणसांच्या कविता इत्यादी इत्यादी यांना जन्म देणारी सृजनदेवता हेच तात्पर्य डोक्यात ना?

२) अशीच त्यांची दुसरी कादंबरिका 'मर्त्य'.

हिचा नायक सदाशिव यावरही Outsider चा प्रभाव. तो म्हणतो- 'हे मृतांचं शहर, हे शहरच मी निवडलंय... हे शहर, आमचं जग, आमचं शतक... नेमकं कशातून आपलं हे शतक व्यक्त होतं?

तुरुंग? असायलम? रुग्णालय? भग्नावशेष? रणांगण? वाट पाहाणं? कंटाळा? जाळ? ट्रायल? सूड? क्रांती? सर्व दारं बंद असलेलं शहर? हा मस्तकात चकरा मारणारा अस्वस्थ कीटक? परकेपणा? विलगीकरण?

...तो मत्सरी वाकुल्या दाखवणारा जुलमी ईश्वर त्याच्या घृणास्पद आनंदात मग्न आहे.

आणि–

...गाडीच्या खिडकीपाशी सुमती आणि छोटी निघाली प्रवासाला. त्या छोटीचे छोटे छोटे हात खिडकीच्या गजातून बाहेर येतात. सदाशिवच्या गालावरून फिरतात. ती हसतेय.

सदाशिव प्लॅटफॉर्मवर एकाकी.

या अफाट माळरानावर एकाकी.

छातीतून एक जबरदस्त हाक गळ्यापर्यंत येते.

छोटेऽऽऽ

तो बेंबीच्या देठापासून ओरडतो. मग धावत सुटतो. मैदानाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत.

छोटेऽऽ छोटेऽऽ

–या हाका एकाकीपणातून मुक्त होण्यासाठी नेणिवेतील त्या सृजनशक्ती-प्रतिमेला?... दुसरं एक तसंच

अस्वस्थ झोपेत, त्याचं एक स्वप्न-

काळा रंग फासलेला माणूस. स्तंभ वाकलेले, भिंतीचा रंग उडालेला, हताश राजा, केस अस्ताव्यस्त, फाटलेली राजवस्त्रं.

मात्र कोवळ्या उन्हात हिरवळीवर धावणारी एक छोटी मुलगी.

–हीही नेणिवेतील कोवळ्या उन्हात अन् हिरवाईत चैतन्य पेरणारी सृजनशक्तीची प्रतिमा?

...असंच आणखी-

ती कृष्णा

तिच्या हातांच्या हालचालीत एक सौंदर्य आहे. निसर्गानं दिलेल्या शरीरात निसर्गाची मस्ती. तिच्या डोळ्यांतला उजेड तिच्या डोळ्यांतून ओथंबायचा.

तिची वेदना ती पदर दूर करून दाखवते.

पदर दूर करते. चोळीची गाठ सोडते. मान मागे झुकती करते.

आपलं शरीर आपली वेदना.

आपलं सौंदर्य आपली वेदना.

ही रेग्यांच्या शार्लट-शहनाज आदींसारखी सृजनरूपिणी कल्पक प्रज्ञा?

३) डहाके हिमालयाची तीनतीनदा यात्रा करतात.

तेथेही उदासी हेच अविनाशी तत्त्व... भय, आशंका, अशाश्वती, क्षणभंगुरता, परकेपणा, संवादहीनता, एकटेपणा, अगतिकता हे सारे शून्यभावन अधूनमधून आहेच.

पण हिमालयातून हिंडताना सगळ्या वनस्पतींशी, जगाशी, पाण्याशी, मातीशी आणि सगळ्या प्राणिमात्रांशी असलेले आपले नाते त्यांना जाणवत राहते. हिमालयाची शिखरे पाहताना तेथील निर्विकल्प शुद्धता बघताना अलौकिक आनंदाने मन भरून जात असताना–



अनुक्रमणिका







हिमालय परमशिव यांच्यावर अनेक रूपके रचत अनेक मिथवांशी एकरूप होत-

ते सृजनशक्तीबरोबरच क्रीडा करीत राहतात.

४) हे डहाके, स्वत: कविता, कथा, कादंबऱ्या, नाटके, ललित लेख, समीक्षा लिहितात. रेखाटने करतात.

वर्गात शिकवतात. चर्चासत्रे, संमेलने, सभा गाजवतात.

पाश्चात्त्य-पौर्वात्य संगीताचा मनमुराद आस्वाद घेतात.

चित्रपटगृहे, नाट्यमंदिरे, कलादालने सर्वत्र कलानंद भोगतात.

वाचन तर–

शेक्सपियर, डोस्टोवस्की, गॉर्की, चेकाव्ह, ओ. हेन्री, मोपॉसा पासून कामू, सार्त्र, काफ्का, पिटर वाईस, सॅम्युएल बेकेट, गॉब्रिएल गार्सिया, मार्खेज पर्यंत. आणि काकोडकरांपासून खानोलकर, नेमाडे, भाऊ पाध्ये, चित्रे, सारंग, कमल देसाई, सानिया यांच्यापर्यंत.

ग्रेस, महानोर, सुर्वे, ढसाळ, सुरेश भट, कोलटकर, धुरी, कोळगावकर हे सर्व कवीही.

दया पवार, लक्ष्मण माने, पार्थ पोकळे, आदींची आत्मचरित्रेही.

श्रीनिवास कुलकर्णी, अनिल अवचट आदींचे ललित लेखही.

वरील त्यांच्या सर्व 'पुष्कळा' अनुभवांचे तात्पर्य असे की, अनेकविध निर्माणक्षम अनुभवांच्या 'पुष्कळा'तून 'होत होत' (become) भावयित्री आस्वादक सर्जनशीलतेच्या पातळीवरही, ते आपल्या कल्पक प्रज्ञेत, सृजनाची अनेक स्वप्ने जगत असतात. सौंदर्यवस्तूंचा (Aesthetic objects) सर्जनशील आस्वाद घेत असतात.

हेही तसे वेगळ्या पातळीवरचे सृजनशक्तीसोबतचे जगणे असते. तोही एक प्रकारचा मुक्तीच्या वाटेवरचा सर्जनशील प्रवास असतो.

या सर्व पार्श्वभूमीवर डहाके यांच्या एखाद्या कवितेच्या काव्यार्थाच्या संदर्भात 'अस्तित्वशून्य' प्रदेशातून सुटण्यासाठी, सृजनशक्तीला आवाहन, हाच मुक्ततेचा मार्ग या कवीला अभिप्रेत आहे, असे एखाद्या वाचकाच्या कल्पक प्रज्ञेला जाणवलं तर, इतर कुणी काही म्हणो, पण निदान वसंत आबाजी डहाके यांची तरी फारशी हरकत असू नये.

## एक संदर्भ :

एखाद्या तात्त्विक वाङ्मयीन संकल्पनेच्या आधारे साहित्यकृतीची समीक्षा करता येते. तसेच संबंधित साहित्यकृतीचे झालेले रसग्राहक आकलन लक्षात घेत संबंधित संकल्पनेचे तीमधील असले-नसलेपण नोंदवित किंवा सुचवित त्या साहित्यकृतीवर भाष्य करणे शक्य असते.

या बाबतीत एक संदर्भ देण्यासारखा :










अल्बर्ट कॅम्यू यांच्या L'Etranger (The Outsider) चा प्रा. शिरिष चिंधडे यांनी 'वेगळा' या नावाने अनुवाद केला आहे. त्याला ख्यातनाम विचारवंत आणि समीक्षक यांनी प्रस्तावना लिहिली आहे.

त्यातील हा संदर्भ– काही विधाने:

...'ही कादंबरी म्हणजे 'अब्सर्ड' वादाची साक्षिणी.

...'अब्सर्ड' वादाची साक्षिणी म्हणून कॅम्यूनी ती लिहिली. पण या कादंबरीत काही महत्त्वाच्या ठिकाणी कलात्मकतेनं प्रमेयात्मकतेवर मात केली आहे.

...अर्थशून्य योगायोगात आता मर्सो अर्थयोग पाहतो.

...मर्सोला जीवनाबद्दल आसक्ती वाटू लागावी. फाशीच्या शिक्षेने त्याची जीवनाबद्दल उदासीनता गळून पडावी ही विसंगतीच नाही काय? अब्सर्डवादी कॅम्यूचा हा पराभवच नाही काय?

...त्यातली खरी गोष्ट अशी की, कलावंत कॅम्यू यांनी तत्त्वज्ञ कॅम्यू यांचा पराभव केला आहे.

जीवनाचा तरल चैतन्यपूर्ण प्रवाह तत्त्वाच्या परिमित कुपीत पकडता येत नाही हेच खरे.

मृत्यू समोर उभा राहिला तेव्हा जीवनाची स्वाभाविक आस प्रभावी बनली. मर्सोच्या अद्यापपावेतो मंद असलेल्या कल्पनाशक्तीला तिनं चेतवलं, ती कल्पनाशक्ती जीवनेच्छेचे खेळ खेळू लागते. कलेच्या दृष्टीने ते योग्यच झाले.

मर्सोच्या मूर्तिकरणाच्या कलात्मक स्वयंगतीमुळेच कॅम्यू आपल्या तत्त्वज्ञानाच्या यांत्रिक-तार्किक चौकटीपलीकडे गेले यात अर्थात एका सत्याचाच विजय झाला.

जीवनेच्छेचं अगर जीवनाच्या आसेचं महान जीवशास्त्रीय सत्य.

मर्सोच्या कल्पनाशक्तीला चेतना मिळून हे सत्य साकार झालं म्हणूनच तिला कलात्मकता प्राप्त झाली.

अनामिक अनुभवानं काढलेली मर्सोची मूर्तरेखा कॅम्यूच्या तत्त्वज्ञानाची दासी बनण्यास तयार नव्हती.

**प्रा. एम. पी. पाटील**
सी-२५/१५ जीवन बीमा नगर
बोरीवली (पश्चिम), मुंबई ४००१०३
दूरभाष : २८९३३९२४

## साभार पोच

**परजा :** अनु. सविता दामले, साहित्य अकादमी, मुंबई, पृष्ठ २७८

**वाघोबांच्या शाळेत :** निवृत्ती लिंबराज शिंदे, कोठावळे प्रकाशन, पृष्ठ

**वास्तुशांत :** राजन बने, नीलकंठ प्रकाशन, पुणे, पृष्ठ ८०



अनुक्रमणिका






# आजच्या ग्रामीण जीवनाचे वास्तव चित्रण- 'बारोमास'



प्रा. मेधा काळे

"शेतकरी कुटुंबात जन्मलो, मातीत राबलो म्हणूनच मातीतल्या माणसांची सुखदु:खे मांडू शकलो. या काळ्या मातीनेच मला लेखक बनवले व गौरवले. शेतकऱ्यांच्या जीवनाला 'बारोमास' वेढून असणाऱ्या, जन्मजात वेदनेच्या हुंकारातून जन्माला आलेल्या या कादंबरीचे प्रेरणास्थान माझ्या सभोवतीचा ओलासुका ग्रामीण परिसर हाच आहे. लेखकाने आपल्या निष्ठा आणि अनुभव यांच्याशी प्रामाणिक राहून लेखन करावे या माझ्यावरील वाङ्मयीन संस्कारांचे फलित म्हणजे 'बारोमास' ही कादंबरी आहे." लेखक सदानंद देशमुख यांचे हे विचार 'बारोमास' वाचताना अगदी यथार्थ वाटतात.

'लचांड,' 'उठावण', 'महालूट' यांसारखे कथासंग्रह व 'महान' ही कादंबरी लिहिणारे सदानंद देशमुख, बुलढाणा जिल्ह्यातील, मेहेकर तालुक्यातील, जानेफळ येथील महाविद्यालयात अध्यापक आहेत. मराठीत एम. ए. केल्यानंतर त्यांनी सुमारे १९७८ च्या सुमारास लेखनाला प्रारंभ केला. धगधगते ग्रामीण जीवन वाचकांसमोर उभे करणारे ते नव्या दमाचे कादंबरीकार आहेत.

स्वातंत्र्यपूर्व काळात इंग्रजांच्या धोरणामुळे खेड्यांची अवस्था दयनीय झाली होती. स्वातंत्र्य मिळाले. म. गांधींनी मंत्र दिला–खेड्याकडे चला. भारत हा कृषिप्रधान देश असून ८० टक्के खेड्यांचा देश. पण आज स्वातंत्र्य मिळून ५५ वर्षे झाली तरी खेड्यांची अवस्था काय आहे? शेतकरी सुखी तर जग सुखी. पण शेतकऱ्यांचे जीवन कसे आहे? याचे उत्तर शोधायला गेले तर भयानक निराशाच पदरी येते. शेतामध्ये येणारे उत्पन्न आणि खर्च यांचे व्यस्त प्रमाण, लहरी निसर्ग, पाचवीला पूजलेला ओला-सुका दुष्काळ, उत्पादन खूप झाले तरी भाव नाही, शेतीत पैसा फक्त जात राहतो, येत मात्र काहीच नाही, पैशाअभावी शिक्षण नाही, नोकऱ्या नाहीत. बारोमास म्हणजे नुसती कडकड आणि रडरड. असे आहे शेतकऱ्यांचे जीवन. त्यामुळे त्यांच्या आत्महत्यांचे प्रमाणही वाढते आहे. पण त्यामुळे प्रश्न न सुटता पाठीमागे राहणाऱ्यांच्या हालात भरच पडते.

'सांजोळ' गावातील एकनाथ या एम.ए. मराठी झालेल्या, 'लीळाचरित्र' ग्रंथावर

नितांत प्रेम करणाऱ्या तरुणाची दर्दभरी कहाणी म्हणजे प्रत्येक ग्रामीण सुशिक्षित बेकार तरुणाचीच कथा आहे. भविष्यात त्याला नोकरी मिळेल म्हणून मोहाडी गावातील एका सधन कुटुंबातील अलकाशी त्याचा विवाह होतो; पण लाख रुपये डोनेशन भरल्याशिवाय नोकरी मिळत नाही. वडील वावर विकायला तयार होत नाहीत. द्विपदवीधर होऊन सात-आठ वर्षे झाली तरी नोकरी नाही, भयाण खेड्यातच राहावे लागते म्हणून अलका माहेरी निघून जाते. एकनाथ नाइलाजाने शेती करू लागतो. पण कधी पाऊसच पडत नाही, दुबार पेरणी करूनही उपयोग होत नाही, तर कधी अतोनात पाऊस पडून पेरणी वाया जाते. धान्य भरपूर आले तरी धान्याला भाव मिळत नाही. व्यापारी मात्र गबर होतात. शेतकरीमेळावे भरविले जातात, मोर्चे काढले जातात, भाषणबाजी होते; पण शेतकऱ्यांच्या परिस्थितीत काहीच सुधारणा होत नाही. एकनाथ मोर्चाचे नेतृत्व करतो, त्याला अटक होते.

एकनाथचा भाऊ मधू पैशासाठी शेतातली झाडे तोडून ती विकतो. रात्ररात्र जमीन खोदून गुप्तधन मिळवण्याच्या मागे लागतो. ग्रामसेवकाची नोकरी मिळवण्यासाठी हट्टाने वावर गहाण टाकायला लावतो. आलेल्या दोन लाखांतून एक लाख मध्यस्थाला देतो, पण एक लाखही जातात, नोकरीही मिळत नाही. उरलेले लाख रुपये घरात पुरून ठेवायची वेळ येते. मधू पुन्हा गुप्तधनाचा शोध घेऊ लागतो. अखेर रात्री रस्त्यावरून जाणाऱ्या गाड्या लुटण्याचा विचार तो आणि त्याचे मित्र करतात. मुलांना नोकऱ्या नाहीत, शेती काही कामाची नाही म्हणून सुभानराव जीवनाचा शेवट करतात, आई शेवंतामाय हाय खाते.

या कथेला अनेक कंगोरे आहेत. आजच्या समाजव्यवस्थेत भरडून निघणाऱ्या अनेक व्यक्तिरेखा आहेत. बी. एड. होऊन तीन वर्षे विनापगार नोकरी केल्यावर कायम करताना एक लाख रुपये डोनेशन भरू न शकणारा दिलीप पवारही गुप्तधन शोधण्याच्या टोळीत सामील होतो आणि खड्डा खोदताना प्रेताचा सापळा अंगावर पडल्याने एवढा भेदरतो की त्याला वेड लागते. गुप्तधनासाठी मंत्रतंत्र करणारा बनुबाबा तरुणांना नादी लावतो. एकनाथच्या बहिणीचा प्रयोगशील शेतकरी असलेला नवरा रावसाहेब कर्जबाजारी झाल्याने गळफास घेऊन आत्महत्या करतो. सोपान भगत एम.एस्सी., बी.एड. झाल्यावर दोन लाख भरून प्राध्यापक होतो. शिकवण्या घेतो. त्यामुळे त्याचे घर म्हणजे आधुनिक राजवाडाच! दिनकर दाभाडे एम. ए. राज्यशास्त्र प्रथम श्रेणीत, तसेच सेट पास. पण लाख रुपये भरू न शकल्याने बेकार. नुसते शिक्षण घेऊन उपयोग नाही तर नोकरीसाठी पैसा हवा.

लेखकाने केलेले स्त्रीजीवनचित्रण तर अत्यंत हृदयस्पर्शी आहे. एकनाथची आई शेवंतामाय. 'शिकल्याशिवाय कुणाचंच भलं व्हत नाही. शिकला की एकु सायब होईल. शिक्षणाने माणूस लय मोठ्ठा व्हतो,' या विचाराने ती पोटाला चिमटा घेऊन, चटणी-भाकर खाऊन मुलांना शिकवते; पण नोकरीसाठी पैसे उभे करण्यासाठी वावर विकायला नकार देते. मधूसाठी मात्र वावर विकल्यावर राहिलेले एक लाख रुपये घरात पुरून त्याची राखण

करण्याची वेळ तिच्यावर येते. शिकलेल्या व शहरात राहिलेल्या सुनेशी– अलकाशी कसे वागावे, हे तिला कळत नाही. तिच्या भावना ती समजून घेऊ शकत नाही. मधूने तोंडात मारल्यामुळे अलका कायमची माहेरी निघून जाते, तेव्हा सुनेचा छळ केल्याच्या आरोपावरून अटक होईल, ही भावना तिला घाबरवून सोडते. मुलांचे हाल तिला पाहवत नाहीत. तरुण जावयाचा अकाली मृत्यू 'शेती' या एकाच कारणाने झाल्याने ती आकांत करते. शेवटी एकनाथला पकडून नेले, नवराही मृत्यूला सामोरा गेला या भावनेने तिने केलेला आक्रोश काळजाला घरे पाडतो. ना शिक्षणाचा उपयोग, ना शेतीचा; या वास्तवाने व्यथित झालेली शेवंतामाय आजच्या सुशिक्षित बेकार तरुणांच्या आईचे प्रतिनिधित्व करते.

शेती, शिक्षणसंस्था, जातिव्यवस्था, मुक्त अर्थव्यवस्था, व्यापाऱ्यांची अरेरावी या सर्वांवर या कादंबरीत येणारे भाष्य अस्वस्थ करते. व्यक्तिरेखांच्या तोंडी याविषयीची चर्चा येते. शेतकऱ्याच्या पोटी जन्माला येणं म्हणजे मागच्या जन्मातलं पाप फेडणं. व्यापार करणारा माणूस दीड क्विंटल अन् शेती करणारा माणूस पन्नास किलो. त्यांच्या गळ्यात बोटाएवढ्या जाडीचा सोन्याचा गोफ आणि तीन बोटांत जाड सोन्याच्या अंगठ्या. मुक्त अर्थव्यवस्थेत शेतकरी जसा डबघाईला आला तसा उद्या कारखानदार होईल, शेतकरी आत्महत्या करतात उद्या व्यापारी फाशी घेतील. नोकरशाहीला पगार द्यायलाही सरकारजवळ पैसा राहणार नाही. दुनियेत एकच गोष्ट अशी आहे की जिला आराम माहीत नाही, ती म्हणजे कर्जाचे व्याज. खेड्यात बुद्धिमत्ता आहे पण संधी नाही. खेड्यातला माणूस पन्नास किलो आणि बाई चाळीस किलोवर भरत नाही. 'बारोमास' राबणाऱ्या शेतकऱ्यांचं मांस शहरानं, सरकारनं, व्यापाऱ्यानं, नोकरशाहीनं खाल्लं. ग्रामसेवक सरकारच्या योजना खपाखप खातो.

भरमसाट डोनेशन घेऊन शिक्षण व नोकऱ्या देणाऱ्या शिक्षणचालकांच्या कानावर सुशिक्षित बेकार तरुणांचा हा आक्रोश जाईल का? शेतकऱ्यांच्या आत्महत्यांनी सरकारचे, लोकांचे डोळे उघडतील का? ग्रामीण भागाची दिवसेंदिवस पिछेहाट होऊन तो मागासलेलाच राहणार का? भरकटलेल्या तरुण पिढीला मार्ग कोण दाखवणार? असे अनेक प्रश्न ही कादंबरी उभी करते. समाजाच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालते. आजूबाजूच्या ग्रामीण व शहरी जीवनाचे भान आणून देणे हे या कादंबरीचे फार मोठे यश आहे.

बारोमासची भाषाशैली वैशिष्ट्यपूर्ण आहे. बोलीभाषेचा वापर केल्याने ते ते प्रसंग जिवंत झाले आहेत. चित्रमयी शैलीमुळे व्यक्तिरेखा डोळ्यांसमोर साक्षात उभ्या राहतात. गुप्तधनासाठी खणण्याचे प्रसंग, मधूने अलकाच्या तोंडात मारण्याचा प्रसंग, एकनाथची घुसमट, उजाड होणारी शेते, श्रीमंत होत जाणारे व्यापारी, शिक्षणसम्राट, भरकटणारी तरुण पिढी, आत्महत्या करणारे शेतकरी या सर्वांचे चित्रण प्रभावी आहे. संवाद अतिशय गतिमान आहेत. विविध भावभावना प्रगट करणारे आहेत.

'कधी यायचे शेतकऱ्याले चांगले दिवस?'

'आता चांगले दिवस मेल्यावरच. शेतकऱ्याच्या पोटी जन्माला येणं म्हंजे मागल्या जन्मातलं पाप फेडणं.'

'शेतकऱ्यांच्या पोरांना जवानी येती का?'

'म्हणजे?'

'म्हंजे असं की शेतकऱ्यांच्या पोरांचं डायरेक्ट प्रमोशन व्हते. बालपणापासून म्हातारपणात. त्याच्यामागे चिंताच एव्हढ्या लागतात की त्यो जवानीतच म्हातारा होऊन जातो. रोजचा दिवस चिंतेचा. शेतीचं अर्थशास्त्र लय इतळलं अन् फाटल्यावर शिवता येतं. इतळल्यावर कुठी शिवता येतं?'

समर्पक प्रतिमांमुळेही भाषा प्रभावी झाली आहे. 'बोलता बोलता काही हरणकाळजे डोळे पावसासोबत गळू लागले.' 'रणरणत्या उन्हातून घामोझोकीर चालताना विहिरीत उडी टाकावी तसा जीव झाला.' 'शेतकऱ्यांचे आभाळव्याकूळ डोळे चातक होऊन पुन:पुन्हा वर पाहू लागले.' अशी कितीतरी उदाहरणे देता येतील.

एकनाथची प्रभावी व्यक्तिरेखा हे या कादंबरीचे वैशिष्ट्य! लीळाचरित्रावर नितांत प्रेम करणारा एकनाथ मनीची व्यथा लीलचरित्राच्याच भाषेत व्यक्त करतो. 'एक तरणु: शिकेला : उच्चविद्याविभुषुतु : परि तो वेकारु :' सासू-सुनेच्या भांडणात कुणाची बाजू घ्यावी हे न कळणारा, भावाच्या अरेरावीने चिडून उठणारा पण काही करू न शकणारा. नोकरी नाही, शेतीतही उत्पन्न नाही म्हणून हताश होणारा, अखेर शेतकरी संघटनेत दाखल होऊन असंतोषाला वाचा फोडणारा एकनाथ अत्यंत विचारी, संयमी, परिस्थितीची जाण असणारा, बुद्धिमान, कविहृदयाचा, सज्जन, सद्विचारी आहे. पण नियती त्याच्या वाट्याला खडतर जीवन देते. समाजव्यवस्थाही त्याला कारणीभूत आहे. एक अस्सल ग्रामीण चित्रपट या कादंबरीवर निघू शकेल.

'बारोमास' हे शीर्षकही समर्पक आहे. मात्र कधी कधी जागतिकीकरण, शिक्षणसंस्थेतील भ्रष्टाचार याविषयी चर्चा पाल्हाळीक वाटते. लेखक आपली मते व्यक्त करीत आहे असेही वाटते. मुखपृष्ठही थोडे अधिक आकर्षक असायला हवे होते. अशा काही गोष्टी सोडल्या तर एकविसाव्या शतकात प्रवेश केलेल्या भारतातील ग्रामीण शेतकऱ्यांच्या कुटुंबांचे अत्यंत वास्तव व दयनीय चित्र रेखाटण्यात लेखक कमालीचा यशस्वी झाला, असे म्हणता येते. मराठी साहित्यात मोलाची भर या कादंबरीने टाकली आहे. व्यक्ति-व्यक्ती, व्यक्ति-समाज, व्यक्ति-निसर्ग, व्यक्ति-नियती यांच्यातला मानसिक संघर्ष व्यक्त करीत अवघा समाज ही कादंबरी आपल्या कवेत घेते. वाचकाला झपाटून टाकते. दर्जेदार कलाकृतीच्या प्रकाशनाबद्दल कॉन्टिनेन्टल प्रकाशन यांना धन्यवाद. साहित्य अकादमी पुरस्काराची शान या कादंबरीने वाढवली आहे.

डॉ. आनंद यादव यांनी म्हटल्याप्रमाणे, 'बाभळीचे झाड वरून हिरवेगार, सुंदर दिसते,

पण हात फिरवला तर काटे टोचून तो रक्तबंबाळ होतो.' तसेच आहे हे ग्रामीण जीवन. १९६० नंतर खऱ्या अर्थाने प्रवाहित झालेला ग्रामीण कादंबरीचा प्रवास उच्चतम पातळीवर पोहोचवून मराठी साहित्याचे दालन या कलाकृतीने कमालीचे समृद्ध केले आहे.

**'बारोमास'**
लेखक – सदानंद देशमुख
कॉन्टिनेन्टल प्रकाशन – पुणे. मूल्य रु. १७५

**प्रा. मेधा काळे**
अहमदनगर.

❑

---

## साभार पोच

**आभाळताना :** सुनील चौधरी, नीलकंठ प्रकाशन, पुणे, पृष्ठ ५८
**दिव्यत्वाची जेथे प्रचीती :** प्रकाश बोकील, आशय प्रकाशन, पुणे, पृष्ठ ११८
**ग्रामगीता रहस्य (स्पंद १) :** सुभाष सावरकर, मराठीजन साहित्य परिषद, अमरावती, पृष्ठ १२६
**सौंदर्यशास्त्राचे स्वरूप :** पी. डी. चौधरी, मराठीजन साहित्य परिषद, अमरावती, पृष्ठ २५६
**भिरभिरं :** विनीता ऐनापुरे, युनिटी प्रकाशन प्रा. लि., पुणे, पृष्ठ १७४
**नियती :** सुनीता नागपूरकर, युनिटी प्रकाशन प्रा. लि., पुणे, पृष्ठ २०६
**बिदी :** सुजाता शिरवळकर महाजन, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ ५६
**लोकगीते (महाराष्ट्रातील) :** विदुला कोळी, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ १५२
**गांडुळखत निर्मिती :** प्रमोद यशवंत कुलकर्णी, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ ५६
**एक होती परी :** माधव सामंत, नवल पब्लिकेशन, परभणी, पृष्ठ ७८
**सत्ता आणि शहाणपण :** माधव गोडबोले, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठ २०२
**सावधान :** सुमती इनामदार, त्रिदल प्रकाशन, मुंबई, पृष्ठ ३२
**सुंठ फुलली :** सुमती इनामदार, वसंत बुक स्टॉल, मुंबई, पृष्ठ १५८
**नित्य दैनंदिन उपासना :** सुमती इनामदार, वसंत बुक स्टॉल, मुंबई, पृष्ठ ११२
**माझे शाहू कार्य :** बाबूराव धारवाडकर, भाई माधवरावजी बागल, विद्यापीठ प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठ २६०
**माझं इवलं हस्ताक्षर :** संजय चौधरी, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ७८
**रंग कलेचे तरंग जीवनाचे :** वि. मा. बाचल, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, पृष्ठ २६६
**हास्य-जीवन :** पी. एन. कुंभारे, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, पृष्ठ १००
**युद्ध प्रतापगडाचे (एक नवा प्रकाश) :** मुकुंद जोशी, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, पृष्ठ ११४
**सावट :** रा. रं. बोराडे, कर्मवीर प्रकाशन, पुणे, पृष्ठ ८८
**विश्वनाथ खैरे यांचा संमत विचार आणि नवी भारत विद्या :** स. ह. देशपांडे, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठ ७८

# वारूळ
## (मातंग समाजाच्या परिवर्तनाची कहाणी)



**प्रा. अजय देशपांडे**

बाबाराव मुसळे या प्रतिभावंत लेखकाच्या मनात परिवर्तनाच्या चळवळीची बीजं रुजली आहेत. अलक्षित अशा समाजव्यथांना कवेत घेणाऱ्या त्यांच्या साहित्यकृतीतून ही बीजे अंकुरली आहेत. परिवर्तनवादी जीवनमूल्य हेच खरे साहित्यमूल्य असते, याचा प्रत्यय बाबुराव मुसळे यांच्या कादंबऱ्या वाचताना येतो.

'हाल्या, हाल्या दूध दे', 'पखाल' आणि आता 'वारूळ' या तीन कादंबऱ्यांमधून बाबाराव मुसळे यांनी परिवर्तनाच्या चळवळीशी अलक्षित अशा समाजघटकांचे नाते जोडले आहे. उपेक्षितांचे वेदनामयी जीवन शब्दबद्ध करतानाच वाचकांच्या मनात परिवर्तनाची सशक्त जाणीव निर्माण करणारी वास्तववादी दृष्टी बाबाराव मुसळे यांच्या लेखनात आहे.

'वारूळ' ही मातंग समाजाच्या व्यथेची कहाणी आहे. परिवर्तनाची सुंदर संस्कृती अंगीकारण्यापूर्वी मातंग समाज क्रूर, भीषण आणि गलिच्छ अंधारात जगत होता. त्या वेदनामयी जगण्याला बाबाराव मुसळे यांच्या लेखणीने शब्दबद्ध केले आहे. माणूस असूनही माणसाच्या जगण्याचा स्वाभिमानाने स्वीकार करण्याचे आत्मभान त्या मातंग समाजाजवळ नव्हते. मातंगांच्या आचारांना आणि विचारांना मानवतावादी, समतावादी जगण्याचे बळ कसे येत गेले, डॉ. आंबेडकरांनी धम्मपरिवर्तन केल्यानंतरच्या काळात मातंग समाज कसकसा बदलत गेला, सामाजिक आणि राजकीय स्थित्यंतरे कशी घडत गेली, धर्माने, चातुर्वर्ण्याने आणि संस्कृतीने लादलेले अमानवीय जगणे नाकारण्याचे आत्मभान मातंग समाजाच्या मनात कसे निर्माण झाले, मातंग समाज कसा घडत गेला, याची सारी कहाणी 'वारूळ'मध्ये आहे. मातंग समाजाच्या परिवर्तनाचा सामाजिक दस्तऐवज म्हणून 'वारूळ' कादंबरीचा उल्लेख करता येतो.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी धम्मपरिवर्तन घडवून आणल्यानंतर दलितांनी बलुतेदारी व्यवस्था नाकारली. बलुतेदारी व्यवस्थेने दिलेली हीन कामे नाकारली, पण दलितांनी

नाकारलेली कामे मातंगांनी स्वीकारली. कारण या समाजाला आत्मभान गवसले नव्हते. दलितांनी नाकारलेली कामे मातंगांनी स्वीकारण्याची घटना, तिचे सामाजिक परिणाम आणि क्रांतीच्या लढाईचे मूक सूचन अशा तीन पदरांतून 'वारूळ'चा प्रारंभ होतो.

स्वातंत्र्याचा लढा आणि डॉ. आंबेडकरांची क्रांती ज्याच्या काळात झाली अशी एक पिढी, त्यानंतरची म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीनंतरची पिढी आणि त्यानंतरची म्हणजे १९६० नंतरची पिढी. अशा तीन पिढ्यांचे वैचारिक ताणे-बाणे येथे चित्रित केले गेले आहेत. स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या तीन दशकांतील मातंग समाजाचे परिवर्तन एकूणच समाज परिवर्तनाच्या प्रक्रियेशी बंध-अनुबंध राखत होते. साक्षर नसलेली पहिली पिढी, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर प्राथमिक शिक्षणापर्यंत पोचलेली दुसरी पिढी आणि त्यानंतर अगदी उच्च शिक्षणापर्यंत पोचलेली तिसरी पिढी, या तीन पिढ्यांचे वैचारिक जडणघडणीचे तपशील, शिक्षणाने जागृत झालेले समाजभान व आत्मभान यामुळे आपल्यासह आपल्या समाजाचाही सर्वांगीण विकास झाला पाहिजे, अशी जाणीव आणि त्यानुसार प्रयत्न, असा संपूर्ण तपशील 'वारूळ'मध्ये येतो. विदर्भाच्या वडगाव नावाच्या गावात घडणारे कथानक फक्त त्या गावापुरते मर्यादित राहात नाही, ते महाराष्ट्रातल्या प्रत्येक गावातल्या मातंग समाजाची कहाणी बनते.

डॉ. अण्णासाहेब भोपळे यांनी मातंग समाजाच्या विकासासाठी जिवाचे रान केले. 'जगेन तर समाजासाठी, मरेन तर समाजासाठी' असा बाणा या युगपुरुषाचा होता. मातंग समाजाच्या उन्नतीसाठी सतत प्रयत्न करणारे डॉ. भोपळे, अण्णाभाऊ साठे महामंडळ मिळवितात, समाजाला त्यामुळे मोठी मदत होते. समाजपरिवर्तनाच्या कार्यासाठी तळहातावर जीव घेऊन कसे आगीतून जावे लागते, ते डॉ. भोपळे यांच्या संघर्षगाथेतून कळते.

वैयक्तिक हेव्यादाव्यातून निर्माण झालेले तथ्यहीन राजकारण विकासाचा बळी घेते. पिढ्यान्-पिढ्या चालत आलेले अंतर्विरोध प्रगतीची गती कशी रोखतात, याचे सूचन 'वारूळ'मध्ये झाले आहे.

मातंग समाजाची स्थितिगती आणि परिवर्तन हा मुख्य विषय या कादंबरीत असला तरी, १९५७ नंतरच्या प्रमुख घटना, सामाजिक व राजकीय स्थित्यंतरे आदींचा भला मोठा कॅनव्हास या कादंबरीला लाभलेला आहे. १९७१ च्या दुष्काळात मातंग समाजाची स्थिती कशी केविलवाणी होती, ते तर कळतेच, पण अशा दीनवाण्या अवस्थेतल्या समाजासाठी सरकार काहीही करू शकत नाही, ते अधिक ठळकपणे दिसते. कुठल्याही शोषित-पीडित समाजघटकाच्या मदतीला शासन कधी धावून येत नाही, हे वास्तव येथे अधोरेखित होते.

समाजपरिवर्तन घडवून आणणाऱ्या माणसांच्या प्रतिमेचा, जनसंघटनांचा, कार्यकर्तृत्वाचा उपयोग केवळ मतांचे राजकारण करणारे पक्ष कसे खुबीने करतात आणि त्यामुळे समाजपरिवर्तनाच्या चळवळीची कशी हानी होते, हेदेखील 'वारूळ' कादंबरीत पाहायला मिळते.



अनुक्रमणिका

गाव, गावकी, भावकी, परंपरागत जातिसंघर्ष, गाव, राज्य, राष्ट्रीय स्तरावरील धर्म, अर्थ, शिक्षण, राजकारण, पंचवार्षिक योजना-त्यांचे फायदे-तोटे, भ्रष्टाचार, भाई-भतिजावाद या आणि अशा काळ्याकुट्ट पार्श्वभूमीवर मातंग समाजकारणात उद्भवलेल्या अंत:प्रवाहाचा वेध मुसळे यांनी घेतला आहे.

या कादंबरीतली भाषा, म्हणी, संवाद, वाक्प्रचार, गाणी, लोकजीवन, समाजजीवन, सारे काही अस्सल आहे. 'जसे जीवन तसे शब्द' हा लेखकाचा बाणा कादंबरीतील जीवनाला अस्सलपणा देतो. गतकालीन आणि समकालीन समाजाच्या स्थितिगतीचा वेध घेताना कमालीची तटस्थता बाळगावी लागते, बाबाराव मुसळे ही तटस्थता बाळगतात. परिवर्तनाच्या चळवळीचे संघर्षमय चित्रण करणारी 'वारूळ' ही कादंबरी आहे.

**वारूळ (कादंबरी)**
ले. बाबाराव मुसळे,
साकेत प्रकाशन, औरंबागाद,
पृष्ठे, ४९२, किंमतं रु. ४००/-

**प्रा. अजय देशपांडे**
वामन घाट रोड,
हनुमाननगर, वणी ४४५३०४
जि. यवतमाळ,
मो. ९८५०५९३०३०

❑

---

## साभार पोच

**अंतर्नाद :** रंजना फडके, प्रकाशक महाराष्ट्र साहित्य कला प्रसारणी, पुणे, पृष्ठ ९६
**विनूची आई :** सुभाष भालचंद्र देशपांडे, स्वत: लेखक प्रकाशक, पुणे, पृष्ठ ६४
**वात्सल्य :** काशीनाथ मंजुलबाई वेलदोडे, लोकहित प्रकाशन, नासिक, पृष्ठ ८८
**झाकलं माणिक :** वसुंधरा हुईलगोल, मधुराज प्रकाशन प्रा. लि., पुणे, पृष्ठ ६०
**बाळाची असुनही आई :** सहदेव कुमठेकर, रूप प्रकाशन, तसैनाबर्डे, नागपूर, पृष्ठ ५०
**महाकवी डॉ. बाबासाहेब आंबेडकर :** वामन निंबाळकर, प्रबोधन प्रकाशन, पृष्ठ १०२
**छावणीच्या कविता :** ज्ञानेश्वर कोळी, निर्मोही प्रकाशन, पुणे, पृष्ठ २६
**शोध :** नीलम माणगावे, सुकृत प्रकाशन, सांगली, पृष्ठ १९२
**मी मलाच शोधतो :** प्रमोद कर्नाड, संवेदना प्रकाशन, चिंचवड, पृष्ठ ७२
**बोलु कवतिके :** अविनाश बिनीवाले, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ८६
**माय मरो पण :** अविनाश बिनीवाले, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ९२
**भगीरथाचे वारस :** वीणा गवाणकर, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ २२
**बाकी शून्य :** कमलेश वालावलकर, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ५२०
**लील चरित्र :** संपा. पुरुषोत्तम नागपुरे, ओंकार प्रकाशन, अमरावती, पृष्ठ ८७८
**श्री ज्ञानदेवांचे अध्यात्म चिंतन आणि आधुनिक विज्ञान :** गोपाळराव मयेकर, हिरण्यकेशी प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठ १०१



अनुक्रमणिका






# परीस

## (सौ. शुभदा साने यांचा प्रासादिक लघुकथासंग्रह)



म. वि. कोल्हटकर

'सानिया' प्रकाशनाने नुकतात सौ. शुभदा साने यांचा 'परीस' या नावाचा बारा कथांचा संग्रह प्रकाशित केला आहे. या संग्रहातील सर्व कथा अगदी मोकळ्या, बोलक्या आणि टवटवीत आहेत.

गेली सुमारे तीन तपांहून अधिक काळ सौ. साने सातत्याने कथा, कविता, बालवाङ्मय अशा स्वरूपाचे चौफेर लेखन करीत आहेत. 'परीस' हा त्यांचा सातवा कथासंग्रह आहे.

त्यांच्या लेखनाचे वैशिष्ट्य म्हणजे कुठलाही आव न आणता अगदी सामान्य माणूस म्हणून त्याच्या बऱ्यावाईट सवयींसह त्या वाचकांमध्ये सहजपणे सामील होतात आणि कथेच्या विश्वात वाचकाला घेऊन जातात. जमिनीवरून आपले पाय कधी उचलले गेले, कळतच नाही. कथेच्या गाभ्यात इतक्या सहजपणे बघताबघता वाचकाचा प्रवेश घडतो.

प्रस्तुत संग्रहातील गोष्टी प्राधान्येकरून घराच्या गोष्टी आहेत. त्यातली काही घरे अभंग उभी, काही मलूल, काही उसासे टाकणारी, तर काही तडा गेलेली आहेत. या घरातील स्त्रिया स्वतंत्र आहेत आणि कुचंबलेल्यापण आहेत. ही घरे पिढ्यापिढ्यांतील अंतर सांगतात. कधीकधी दुरावलेपणातही आनंदाची एखादी शीतल झुळुक या घरातून उमटते.

नियतीचे फासे कसे उलटे पडतात, हेही काही कथा चित्रित करतात. मध्यमवर्गीयांच्या व्यथा-वेदना, स्वप्ने हळुवारपणे साकार करण्यात लेखिकेने स्पृहणीय यश मिळविले आहे.

कुलकर्णी हे गरीब, समंजस बिऱ्हाडकरू वाड्याच्या मालकिणीची कडवी शिस्त निमूटपणे दीर्घकाळ पाळत आले आहेत. पुढे बिल्डर वाडा विकत घेतो. तिथे अपार्टमेंट उभे राहते. वाड्याच्या मालकिणीला आणि कुलकर्णी यांना अपार्टमेंटमध्ये फ्लॅट मिळतो, तेव्हा मालकिणीला आपली जहागीर खालसा झाल्याचे वाईट वाटते, तर आपणही फ्लॅटधारक होऊन घरमालकिणीच्या पातळीवर आलो या गोष्टीचा कुलकर्णी यांना वेगळाच आनंद होतो. खाली मान घालून वावरणारे कुलकर्णी मालकिणीच्या मुलीला स्पष्टच



अनुक्रमणिका

म्हणतात, "तुझ्या बाबांबद्दल आम्हाला काही म्हणायचं नाही; पण तुझी आई मात्र आमच्याशी नेहमी चढेलपणानंच वागली." 'नवी इमारत' या कथेमध्ये अपार्टमेंट संस्कृतीच्या आगमनामुळे निर्माण होणारी भावनिक आंदोलने आत्मप्रत्ययकारी वाटतात.

'नवा संसार' या कथेत आणखी एक वेगळेच घर आपल्याला भेटते. पूर्वी सासुरवासाच्या काळात मालतीबाईंची कुचंबणा होत आली आहे. आता मुलाचे लग्न झाल्यावर मुलगा आणि सून यांना स्वत:च पुढाकार घेऊन वेगळे बिऱ्हाड त्या थाटून देतात आणि मग आपल्या आजवर दपडून राहिलेल्या हौसमौजेच्या टुकटुकीत अशा स्वत:च्या संसाराची उतारवयात मांडामांड करण्यात तल्लीन होतात.

पुण्यातले आपले आजोबा वारल्यावर अमेरिकेत स्थायिक झालेला त्यांचा अनिरुद्ध पुण्यात येतो. तेव्हा एकाकी आणि ओस पडलेले आपले वाडवडिलार्जित घर पुन्हा जिवंत झाल्यासारखे त्याला वाटते. आपण अमेरिकेत परतल्यावर पुन्हा हे घर मृतवत् होईल ही कल्पना अनिरुद्धला सहन होत नाही. ते घर माणसांनी गजबजलेले म्हणजे जिवंत, जिते-जागते राहवे म्हणून अनिरुद्ध विकून टाकतो.

'विक्रमादित्याचा शोधात' या कथेला विक्रम-वेताळाच्या गोष्टीचा संदर्भ उठावदार करतो. सावत्र आईच्या काचात वाढलेल्या उषेचे लग्न एका विधुराशी करण्यात येते. पूर्वी तिला आपल्या भावंडांची सर्व सेवा करावी लागे. आता नवऱ्याच्या प्रथम पत्नीच्या मुलांची देखभाल करण्याचे भागधेय तिच्या वाट्याला येते. कुचंबलेल्या उषेची अखेर बाळंतपणात होणारा मृत्यूच सुटका करतो.

मीनाताईंना प्रथम पतीपासून झालेली मुलगी नेहा हा त्यांचा एक रेशमी धाग्याने बांधलेला आधार आहे. पतिनिधनानंतर त्या डॉ. शशिकांत या विधुर पतीच्या संसारात रममाण होऊ पाहत आहेत. 'नेहाला माहेरपणासाठी आण' ही सूचना डॉ. शशिकांत यांचीच. स्वत:च्या नव्या संसारात लेकीचे माहेरपण त्या करू इच्छितात. पण लेकच आईला गुहागरच्या घरी बोलावते. मग गुहागरला जाऊन लेकीचे अगदी मनासारखे माहेरपण करायचे असे मीनाताई ठरवितात. त्यासाठी कितीतरी लेकीच्या आवडीच्या वस्तू त्या बरोबर नेतात. प्रत्यक्षात मीनाताई गुहागरात उतरल्यापासून लेकच आईच्या आवडी-निवडी ध्यानी घेऊन इतके काही कौतुक करते की त्या मायेच्या भडिमारात मीनाताई आपण लेकीचे माहेरपण करायला गेलो होतो, हे विसरतात आणि ओशाळ्या होतात. आपल्या लेकीच्या ठायी मीनाताईंना त्यांची स्वत:ची आईच जाणवते. उभयपक्षी मायेचा होणारा हा वर्षाव एक आल्हाददायक अनुभव देतो.

कोमल निरागस भावनेच्या हिंदोळ्यावर स्वार झालेली 'तिच्या मामाचे लग्न' ही आणखी एक भावस्पर्शी कथा आहे. छोट्या अल्लड बेबीला सावत्रमामाच्या लग्नात दूरदूरच ठेवले जाते. बेबीचे मन तर नटूनथटून लग्नात बागडण्यास उत्सुक आहे. बेबीच्या कोवळ्या



अनुक्रमणिका







मनाला आपण सावत्र मुलगी आहोत ही या निमित्ताने जाणीव होते.

छोट्या बाळाचा आपल्या पोटी जन्म होणे हे स्त्रीचे गर्भरेशमी स्वप्न असते. मंदा ही पत्रद्वारे असे हे अधुरे स्वप्न कल्पनेच्या सृष्टीत पूर्णतेला आल्याचे रंगवत जाते. सुलभा या अमेरिकेतील मैत्रिणीला पत्राद्वारे आपल्या छोट्या मृणालच्या नाना लीला ती रंगवून सांगते. स्वप्नाचे रंग गहिरे होतात. सुलभा भारतात येणार, हे मंदाला कळल्यावर अशी एक कच्ची कळी सुकून गळून पडते.

सुनेला तिच्या पतीपासून अपत्यप्राप्ती होऊ शकणार नाही, असे कळल्यावर त्या सुनेला बळाने तिच्या दिरापासून पुत्रसंभव घडवण्याचा अचाट विक्रम सासू करते. 'नातू' या कथेतील हे वास्तव विपरीत वाटते. एरवी बंडखोर वाटणारी सून या दंडेलीला का व कशी बळी पडली हेही या कथेत स्पष्ट होत नाही.

'बाप-लेक' या कथेची मांडणी ठीक असली तरी ती थेट कर्मफलसिद्धांताकडे झुकलेली आणि म्हणून आध्यात्मिक वाटते.

कथांना संततधार प्रवाहीपण असल्यामुळे मुद्रणात दोष भेटले, तरी ते संत्रस्त करीत नाहीत. (क्रमांक ६ च्या कथेवर मूर्धस्थानी शीर्षकाची टोपीच हरवलेली आहे!)

घर, घरटे, पंख, पिसे, चिमणचारा अशा स्वरूपाच्या या गोष्टी आहेत. कथा मोठ्या नाहीत. छोट्याच आहेत. सायलीच्या फुलाप्रमाणे नाजूक, सुंदर. मात्र 'परीस' हे संग्रहाला देण्यात आलेले नाव अगदी ढोबळ वाटते. अधिक सूचक, सौम्य असे शीर्षक देता येणे अशक्य नव्हते.

कथालेखिका सौ. शुभदा साने या मागील पिढीतील विख्यात कथा-कादंबरीकार कै. श्री. ज. जोशी यांच्या कन्या असूनही त्यांना स्वतंत्र प्रतिभा आणि शैलीने संपन्न असे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व लाभले आहे.

**परीस** **म. वि. कोल्हटकर**

लघुकथासंग्रह

सौ. शुभदा साने, सानिया प्रकाशन, पुणे पृष्ठे १०८, मूल्य रु. ११०/-

❑

---

### साभार पोच

**नाते सर्वांशी :** एकनाथ धांडे, स्वप्नसुधा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ७८

**हे सर्व कोठून येते? :** विजय तेंडुलकर, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ १९६

**रातराणी :** विजय तेंडुलकर, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ १२२

**आणि मी :** विजय तेंडुलकर, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ १३२

**ते :** विजय तेंडुलकर, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ १३०










# विठ्ठल मागे मुक्ती — काही विचार



डॉ. ब्रह्मानंद देशपांडे

*(महाराष्ट्र साहित्य पत्रिका (अंक क्र. ३१२, जानेवारी-फेब्रुवारी-मार्च २००५) या अंकातील डॉ. मोहन गोविंद धडफळे यांचा 'विठ्ठल मागे मुक्ती' हा लेख वाचला. त्यावरील काही विचार पुढे नोंदवित आहे. यात सत्यान्वेषणापरता अन्य हेतू नाही.)*

**१. सतीची चाल.**

ऋग्वेदात मृताच्या पत्नीला, 'हे बाई! तू या चितेपासून ऊठ आणि दिराचा हात धरून नव्याने जीवनाचा प्रारंभ कर' असे म्हटले आहे. मग रानटी सतीची चाल आली कुठून, असा प्रश्न डॉ. धडफळे विचारतात. सतीची चाल भारतात नव्हतीच ती आणली शक, हूण आदि परकीय आक्रमकांनी. शकांमध्ये ही चाल होती (Sakas in India, Satya Prakash, P. 111) भारतातील पहिला सतीलेख मध्यप्रदेशात एरण येथे सापडला आहे. (CII., III, P. 92). यात गुप्त सम्राट भानुगुप्त याचा सेनापती गोपराज हा हूणांशी युद्ध करताना मारला गेला आणि त्याची पत्नी सती गेली असा उल्लेख आहे. लेखाचा काळ गुप्त संवत १९२ (इ. स. ५११) असा आहे. म्हणजेच भारतातला पहिला सतीलेख हूणांच्या आक्रमणाशी संबंधित आहे. भारतीय समाजावरील परकीय आक्रमणांचा संदर्भ ध्यानात ठेवल्याशिवाय समाजजीवनाचा स्पष्ट आलेख आपल्यासमोर येत नाही. बाणभट्टाने तर सतीच्या चालीची निंदाच केली आहे. ती चाल धर्मसंमत असती तर तो असे करता ना.

**२. राजकुल आणि देवकुल**

भारतात राजाला देव मानले जात होते हे खरे. राजकुल या शब्दाचे रूप राजउल-राजुल-राऊळ असे होते. राऊळ म्हणजे राजनिवास, राजवाडा किंवा राजा स्वत:ही. राऊल, वड्डुराऊल या संज्ञा शिलाताम्रशासनात आल्या आहे. प्राचीन मराठी साहित्यात राऊल शब्द राजा या अर्थी येतो. उत्तर भारतात राजाला 'दरबार' असे संबोधितात. हे सर्व लक्षात न घेता रा. चिं. ढेरे हे राऊल शब्दाचा शैव योगी असा चमत्कारिक अर्थ करतात. तद्वत देवकुलापासून देगुल ('व' चा 'ग' होणे) देऊळ शब्द येतो. नांदेड जिल्ह्यात देगलुर गाव

(देगुल + ऊरु) गाव आहे. मृत राजांच्या प्रतिमा असलेल्या स्थानास देवकुल म्हणत. सातवाहनांचे देवकुल नाणेघाटात तर कुशाणांचे मथुरा येथे होते. यात राजांच्या प्रतिमा असत. मात्र त्यांची पूजा होत असे याला मात्र किंचितही आधार नाही.

### ३. शूद्र कोण?

आर्य भारतात बाहेरून आले. येथे त्यावेळी सिंधू संस्कृती (खरे तर हरप्पा संस्कृती) नांदत होती असा सिद्धांत. तेव्हा आर्य त्रैवर्णिक आणि सिंधू संस्कृतीचे लोक ते शूद्र असा सिद्धांत. हरप्पा संस्कृतीचे अवशेष पश्चिमी आणि पश्चिमोत्तर भारत, गुजराथ, खानदेश भागातच सापडले आहेत. उर्वरित विशाल भूभागाचे काय? या भागात हरप्पा संस्कृती नव्हती. आर्यांच्या आक्रमणाच्या काळी संपूर्ण भारत अगदी एकाच संस्कृतीच्या प्रभावाखाली एकरस होता, हे मानणे कितपत शास्त्रशुद्ध आहे? तेव्हा आर्य 'शूद्र' कोणाला म्हणतात हा प्रश्नच आहे.

### ४. पूजा

आता पूजा या शब्दाविषयी. पू (हू) हा द्राविडी भाषेतील शब्द. तो हरप्पा संस्कृतीत वावरत होता हे कशावरून? तो सुदूर दक्षिण भारतातील शब्द. अगदी वेगळ्या संस्कृतीतला. हरप्पासंस्कृतीची लिपी आहे. त्यांची भाषाही वेगळी असणार. एस्. आर्. राव या प्रख्यात पुरातत्त्व शास्त्रज्ञाने ही लिपी उलगडण्याचा प्रचंड उद्योग केला आणि हरप्पा मुद्रांवरील लेख प्राचीन संस्कृत भाषेत आहे असे प्रतिपादले. तेव्हा 'पूजेचा' हा द्राविडी प्राणायामच म्हणायचा.

### ५. देऊळ आणि यज्ञकुंड

आता हरप्पा संस्कृतीतील लोक मूर्तिपूजक असतीलही. पण संपूर्ण हरप्पा संस्कृतीत देवळाचे अवशेष मात्र अजिबात सापडलेले नाहीत. उलट कालिबंगन, विरहाणा, लोथल या ठिकाणी यज्ञकुंडे मात्र सापडली आहेत. देवांच्या मूर्ती ओट्यावर, झाडाखाली असत. यक्षांच्या मूर्तीच्या चौथऱ्यांचा उल्लेख पाणिनीने 'उत्थिता: आसका: वैश्रवणस्य' असा केलाच आहे, तेव्हा हरप्पा संस्कृतीमधील 'शूद्रांनी' त्रैवर्णिकांना 'मंदिर प्रवेश' देणे जरा दुरापास्तच दिसते.

### ५. हरप्पा संस्कृती आणि शूद्र

प्रथमत:च मनात असा प्रश्न उठतो की, अस्पृश्यता, शूद्र या संकल्पना कुणाच्या असतील? घोड्यांवरून दौडत येणाऱ्या आर्यांच्या की प्रशस्त, तटबंदीयुक्त पुरे, व्यापार, सांडपाण्याची व्यवस्था अशा संकुल संस्कृतीत वावरणाऱ्या हरप्पा संस्कृतीतील लोकांच्या? हरप्पा संस्कृतीतील नगराच्या तटबंदीबाहेर श्रमिक लोकांच्या वसाहतींचे अवशेष आहेत. हे हरप्पा संस्कृतीतील शूद्र. अस्पृश्य. अस्पृश्यता ही आर्यपूर्व आहे असे ठाम प्रतिपादन श्री. प्र. रा. देशमुख या (अन्यथा आर्यविरोधक) विद्वानाने केले आहे (सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदू संस्कृती, पृ. २१७-१८). आर्यांच्या यज्ञात तर ब्राह्मण आणि शूद्र रस्सीखेच खेळत असत (तैत्तिरीय ब्राह्मण आणि तांड्य ब्राह्मण).

### ६. आर्य आणि मूर्तिपूजा

आर्य हे मूर्तिपूजक नव्हते असा प्रवाद रूढ आहे; पण तो सर्वस्वी खरा नव्हे. सामवेदात अग्नीच्या, तर ऋग्वेदात वरुण आणि इंद्राच्या मूर्तींचा अगदी स्पष्ट उल्लेख आहे. (ग. ह. खरे, मूर्तिविज्ञान, पृ. १९, याशिवाय Elements of Hindu Iconography हा डॉ. जयंतनाथ बॅनर्जी यांचा ग्रंथ पाहावा.) आर्यांचा धर्म यज्ञप्रधान खरा, पण ते यज्ञ सोडून इतर काहीच करीत नव्हते. हे विधान धाडसाचे होय. त्यासाठी बलवत्तर अशा पुराव्याची आवश्यकता आहे.

### ७. वेद आणि हरप्पा संस्कृती

आर्यांचे आक्रमण आणि हरप्पा संस्कृतीचा नाश हे समीकरण वानरीच्या मृत शिशूप्रमाणे उराशी घट्ट कवटाळले गेले आहे. या अभेद्य 'तटबंदीला' छेद देणाऱ्या काही गोष्टी नोंदवतो. अथर्ववेदातील एक वृष (कांड ६, सूक्त ८६) आणि हरप्पा संस्कृतीमधील एकशृंग (Unicorn) यांचे साम्य दर्शविले गेले आहे. (डॉ. प्र. वि. पाठक, विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९९८, पृ. ३५). तर हरप्पा संस्कृतीमधील काही मुद्रांचा उलगडा अथर्ववेदातील ऋचांच्या आधारे होऊ शकतो. (तत्रैव, १९९६, पृ. ३०). तटबंदीची पुरे अनार्यांची आणि ती आर्यांनी नष्ट केली म्हणावी तर 'हे इंद्रा! तू आमचे शंभर पुरांनी रक्षण कर' अशी प्रार्थना ऋग्वेदातच आहे. हरप्पा संस्कृतीला 'दास' संस्कृती म्हणून मध्ययुगातील रामदास, पुरंदरदास आदि नावांची मुळे शोधावी तर अगदी ऋग्वेदातील सुदास, दिवोदास या नावांचे काय करायचे?

### ८. देवानां प्रिय अशोक

सम्राट अशोक याच्या अभिलेखांचा प्रारंभ 'देवानां पिय', 'पियदसी' असा होतो. देवांना प्रिय या शब्दाचा अर्थ धडफळे यांनी देव म्हणजे राजा असे समजून आजूबाजूच्या राजांना प्रिय असा केला आहे. पण देवानां प्रिय हे विशेषण केवळ राजांनाच लावले जाते असे नाही. ज्ञातधर्मकथांगसूत्र या जैन ग्रंथातील माकंदीदारकचरित या भागात ते माकंदीला लावले गेले आहे. याच कथेत ते रत्नद्वीपदेवी या स्त्रीला लावले गेले आहे, तो केवळ सन्मानदर्शक शब्द आहे.

अशोक बौद्ध होता म्हणून देव मानत नव्हता हे विधानही चिंत्य आहे. जंबूद्वीपात देव आणि मनुष्य एकत्र मिसळत नव्हते, ते मिसळण्याचा प्रारंभ मी केला असे तो म्हणतो. त्याने (पटचित्राच्या साहाय्याने) काही 'दिव्य' दृश्ये दाखवून आनंदाप्रमाणेच धर्मप्रचार केला.

### ९. विठ्ठल दाक्षिणात्य

विठ्ठल दाक्षिणात्य हे मत आता सर्वमान्य आहे. पण ग्वाल्हेरच्या तोमरोच्या वंशावळीत विठ्ठल हे नाव दहाव्या शतकात सापडते. इति शम्

**डॉ. ब्रह्मानंद देशपांडे.**
ऐतिहासिक, १४, श्रेयनगर, औरंगाबाद, ४३१००५



# समाजविकासाची मूलगामी चर्चा करणारा ग्रंथ



डॉ. मृणालिनी शहा

डॉ. इंदुमती गोवर्धन पारिख यांनी आपल्या डॉक्टरी व्यवसायाबरोबरच मानवतावादी दृष्टिकोनातून सुमारे चाळीस वर्षे समाजकार्य केले आहे. 'स्त्रीहितकारिणी' या संस्थेमध्ये तळागाळातील व्यक्तींसाठी कार्य केले आहे. हे काम करत असताना या दुर्बल गटातील लोकांना सुदृढ, स्वतंत्र आणि संपूर्ण जीवन जगताना किती अडथळे येतात याची जाणीव इंदुमतीबाईंना झाली. अनेक प्रकारचे भलेबुरे अनुभवही त्यांना आहेत. आयुष्यभराच्या त्यांच्या अनुभवचिंतनातूनच 'समाजविकासासाठी व्यक्तिविकास' हे पुस्तक साकार झाले आहे.

प्रारंभी पुस्तकाचे प्रयोजन समजावून घेणे गरजेचे आहे.

आपण आज एकविसाव्या शतकात पदार्पण केले आहे. जागतिकीकरणामुळे आणि विज्ञानतंत्रज्ञानाच्या प्रगतीमुळे आपली एकीकडे प्रगती झाली आहे, तर दुसरीकडे भारतातील सामान्य माणूस आज अडाणी, हतबल, दरिद्री व हताश झालेला दिसतो. भविष्यकाळात आपले जीवन सुधारेल याची, सामान्य माणसाला फारशी आशा नसल्यामुळे एका बाजूस तो देववादी आणि दैववादी बनत चालला आहे, तर दुसऱ्या बाजूस तो अतिरेकी आणि हिंसक बनत आहे. कितीतरी लोकांना शिक्षणाची संधी देखील आपल्या या प्रगत समाजात मिळत नाही. त्यामुळे हा सामान्य माणूस स्वत:चा व समाजाचा विकास घडवू शकत नाही. म्हणूनच या नव्या शतकात अनेक समस्यांना आपल्याला सामोरे जावे लागणार आहे. हे शतक माणसाच्या विकासाचे शतक ठरणार, की विनाशाचे असा प्रश्न संवेदनशील लोकांच्या मनात उभा राहतो आहे. त्याचप्रमाणे या भारतीय समाजात फार मोठे परिवर्तन घडवून आणण्याची गरजही काही सुज्ञ माणसांच्या लक्षात येते आहे. परंतु ते कसे करावे, हे मात्र त्यांच्या ध्यानात येत नाही. म्हणूनच समाजातील उणिवा लक्षात घेऊन समाजात परिवर्तन कसे व कोणत्या मार्गांनी करावे, याचा ऊहापोह या पुस्तकात केला गेला आहे. तोच या ग्रंथाचा हेतू आहे.

भारतीयांच्या समोर असलेल्या अनेक प्रश्नांची उत्तरे सोपी नाहीत. तथापि सद्य:परिस्थितीचे योग्य आकलन केल्यास पुढील मार्ग आखण्याची दिशा मिळणे शक्य आहे, असे

लेखिकेला वाटते, म्हणून त्यांनी आपल्या जीवनातील संकल्पना आणि अनुभव या दोहोंवर आधारित असा सोपा व सुटसुटीत ग्रंथ लिहून मराठी वाचकांसाठी एका नव्या दृष्टिकोनाचे दालन उघडून दिलेले आहे. मानवतावादी दृष्टी आजच्या तरुण व पुढील पिढीतल्या मुलांनी अंगी बाणवली तर व्यक्तिविकासाद्वारे आपला समाजविकास साधता येईल, असा विश्वास त्यांनी या पुस्तकातून व्यक्त केला आहे. समाजविकासातून राष्ट्रीय स्वातंत्र्याचीही उभारणी होईल आणि त्यातूनच देशाचे प्रश्न सुटतील, असे तर्कशुद्ध गृहीतक या ग्रंथातील विवेचनामागे आहे.

भारतीय समाजाचा मानवी दृष्टिकोनातून विकास करत असताना समाजातील अनेक बाजूंचा विचार करावा लागणार, हे उघड आहे. त्यासाठी या ग्रंथाची विभागणी पाच विभागांत केली आहे. 'समस्या' या पहिल्या विभागातील प्रकरणे आपल्या देशाच्या व व्यक्तींच्या समस्या समजावून देण्यासाठी लिहिली आहेत. त्यातील 'आजची सामाजिक स्थिती' हे प्रकरण वर्ण्यविषयाची पार्श्वभूमी समजण्यासाठी अत्यंत उपयुक्त असे आहे. या ग्रंथातील विवेचनात वैचारिक व शाब्दिक घोळ न घालता नेमक्या भाषेत प्रश्नांचे विश्लेषण केले आहे. मुख्य म्हणजे सामाजिक समस्या सोडवताना व्यक्तिविकासाशिवाय समाजविकास शक्य नाही, हे त्यांचे प्रतिपाद्य स्पष्ट केले आहे.

पुढील तीन विभाग माणसाच्या जीवनाच्या समग्रलक्ष्यी संकल्पनेवर आधारलेले आहेत. स्वतंत्र जीवनासाठी समग्र ज्ञानाची गरज असते. म्हणून पृथ्वीचा जन्म व मानवाचे निसर्गातील स्थान, माणूस व पर्यावरण, अंधश्रद्धा व शास्त्रीय दृष्टिकोन या विषयांची समग्र ओळख करून दिली आहे. प्रत्येक व्यक्ती जन्माला आल्यापासून जीवनाच्या अंतापर्यंत कोणकोणत्या विविध अंगाने विकास करू शकेल याची दिशा या सूत्रातून दिसून येते. त्यात स्वतंत्र माणूस, संपूर्ण माणूस आणि सुदृढ माणूस अशी सोपी व सुटसुटीत विभागणी करून आनुषंगिक प्रकरणांचा समावेश केला आहे.

माणसाच्या स्वतंत्र होण्यामध्ये 'अंधश्रद्धा' हा एक मोठाच अडसर झाला आहे, या वस्तुस्थितीची त्यांनी जाणीव करून दिली आहे. त्यानंतर निसर्गनिर्मित जग व मानवनिर्मित जग यांचा परस्परसंबंध कसा आहे आणि हा संबंध कसा असावा, याचे साक्षेपी विवेचन लेखिकेने केले आहे.

'संपूर्ण जीवन' या संकल्पनेची जाण भल्याभल्या विद्वानांना, सुशिक्षितांना होत नाही. या 'संपूर्ण'तेच्या कक्षा किती विस्तारित व समग्रलक्ष्यी असाव्यात, यासंबंधीचे विचार मांडताना त्यांनी जे लेख लिहिले आहेत, ते मुळातून वाचण्यासारखे आहेत. मानवी समाजाची उत्क्रांती, कुटुंब व विवाहसंस्था यांची माहिती वाचकांना करून दिली आहे. स्त्रीजीवनाचे एक महत्त्वाचे कार्य म्हणजे मानववंशवृद्धी आहे, हे सांगून पुढील भागात कुटुंबनियोजनाचे महत्त्व पटवून दिले आहे.



अनुक्रमणिका

माणूस हा पशू नाही म्हणूनच त्याचे जीवन समृद्ध करण्यासाठी सौंदर्य व कलांचा आस्वाद आवश्यक असल्याचे त्यांनी प्रतिपादन केले आहे. माणसाने नागरिक म्हणून जगताना सामाजिक व राजकीय शिक्षण घेतले तर राष्ट्राचा विकास होतो, असा विचार त्यांनी येथे मांडला आहे.

चौथा विभाग हा माणसाच्या सुदृढ असण्याशी संबंधित आहे. शरीरशास्त्र, आहारशास्त्र, आरोग्य आणि अनारोग्य, प्रथमोपचार इत्यादी रोजच्या जगण्यासाठी आवश्यक असलेल्या विषयांची उकल डॉ. पारिख यांनी थेट व सोप्या शब्दांत करून वैद्यकशास्त्राभोवती असलेले गूढ वलय कमी करण्याचा प्रयत्न केला आहे. सुदृढ होणे व सुदृढ राहणे कसे सहजशक्य आहे, हे सामान्य व्यक्तीच्या लक्षात आले तर आपल्या समाजाचे व देशाचेच आरोग्य सुधारण्याला वेळ लागणार नाही, असे त्यांना वाटते.

शेवटच्या भागात समाजपरिवर्तन हा सर्व समाजकार्यांचा ध्येयबिंदू कसा असावा, याचे मार्मिक विवेचन केले आहे. एकूणच या ग्रंथातील सर्व विभाग मूळ विषयाला पूरक असेच आहेत.

डॉ. इंदुमती पारिख या स्वत: झोपडपट्टीतील स्त्रियांमध्ये काम करत असल्यामुळे त्यांच्या या ग्रंथात 'स्त्री'ला आणि तिच्या समस्यांना झुकते माप मिळाले आहे. 'स्त्री' हा घटक समाजाचा अंतिम उद्‌गाता ठरणार आहे, ही इंदुमतीबाईंची धारणा यातून व्यक्त होते. डॉ. पारिखांचे सहकारी डॉ. रमेश पोतदार यांनी या ग्रंथाला विवेचक प्रस्तावना लिहिली आहे. त्यातून या ग्रंथाची आणि लेखिकेच्या सामाजिक कार्याची ओळख होते. शास्त्रीय माहिती देणारी रंगीत छायाचित्रे, विविध आलेख यांमुळे या पुस्तकाची वाचनीयता वाढली आहे.

या ग्रंथातील पानांपानातून लेखिकेला असणारी समाजविकासाची तळमळ जाणवते. या ग्रंथाचा उपयोग सर्व थरांतील समाजकार्यकर्त्यांना होईलच, परंतु राजकीय नेत्यांना देखील यातून काही एक दिशा मिळेल असे वाटते. प्रत्येक सुजाण वाचकाने हे पुस्तक वाचून स्वत:बरोबरच समाजाचा विकास करायला पाहिजे, अशी शिफारस करावीशी वाटते.

**डॉ. मृणालिनी शहा**



१, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवन, पुणे – ४११ ००४.

*(परीक्षित ग्रंथ : 'समाजविकासासाठी व्यक्तिविकास' – इंदुमती पारिख, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. २००३, पृष्ठे – २०४, मूल्य रु. २२५/–)*

❑

## कार्यवृत्त



### पुणे शाखा

**दि. १८ सप्टेंबर २००५ कै. डॉ. भालचंद्र फडके यांचा प्रथम स्मृतिदिन :** श्रीमती हेमा फडके व फडके यांच्या कन्या यांच्या उपस्थितीत आणि पुणे विद्यापीठाचे माजी कुलगुरू डॉ. राम ताकवले यांच्या अध्यक्षतेखाली थोर समीक्षक कै. डॉ. भालचंद्र फडके यांचा प्रथम स्मृतिदिन आयोजित करण्यात आला. कै. डॉ. फडके यांचे विद्यार्थी, सुहृद, सहकारी यांची डॉक्टरांच्या आठवणींबद्दलची भाषणे झाली. डॉ. अरुणा ढेरे. डॉ. कल्याणी दिवेकर, श्री. रामनाथ चव्हाण, श्री. तेज निवळीकर, डॉ. सी. जी. देशपांडे, दै. लोकमतचे संपादक श्री. अनंत दीक्षित, श्री. विश्वासराव नाईकनवरे इ. वक्त्यांची या प्रसंगी भाषणे झाली. कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांनी सूत्रसंचालन केले व स्थानिक कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले. फडकेसरांचे अनेक विद्यार्थी/विद्यार्थिनी व साहित्य क्षेत्रातील/शैक्षणिक क्षेत्रातील अनेक मान्यवर या प्रसंगी बहुसंख्येने उपस्थित होते.

**दि. २ ऑक्टोबर २००५ :** म. सा. परिषदेच्या शताब्दी वर्षानिमित्त 'संगीत सौभद्र' नाटकाचा प्रयोग परिषदेच्या आजीव सभासद, देणगीदार व हितचिंतक यांच्यासाठी नि:शुल्क आयोजित करण्यात आला. भरतनाट्यमंदिर, पुणे, या रंगमंदिरात भरत नाट्यमंदिर संस्थेच्या नाट्य कलावंतांनी सादर केलेल्या या नाट्यप्रयोगास नाट्यप्रेमी रसिकांचा प्रचंड उत्स्फूर्त प्रतिसाद लाभला. म.सा.प. चे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या प्रमुख उपस्थितीत, मध्यंतरात नाटकाचे दिग्दर्शक व भरत नाट्यमंदिर संशोधन संस्थेचे पदाधिकारी यांचे हृद्य सत्कार करण्यात आले. परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर आणि प्रमुख कार्यवाह रवींद्र भट यांची समयोचित भाषणे झाली.

**दि. ७ नोव्हे. २००५ कवी केशवसुत शताब्दी (२००४ ते २००५) सांगता समारंभ :** या निमित्ताने व म.सा.परिषदेच्या शताब्दीनिमित्ताने दोन प्रकारच्या काव्यस्पर्धा घेण्यात आल्या. एक काव्यवाचन स्पर्धा (शाखांतर्गत), दुसरी काव्यलेखन स्पर्धा (म. विद्यालयीन/विद्यापीठ स्तरावर). महाराष्ट्रातील परिषदेच्या शाखांतर्गत काव्यवाचन स्पर्धा आयोजित करण्यात आली होती. या स्पर्धेत यशस्वी झालेल्या गावोगांवच्या सुमारे ४२ कवी/कवयित्रींचे संमेलन पुण्यात उद्यान प्रसाद मंगल कार्यालयात आयोजित करण्यात

आले होते. या समारंभाच्या प्रमुख पाहुण्या परिषदेच्या उपाध्यक्ष श्रीमती वसुंधरा पेंडसे-नाईक यांच्या हस्ते ह्या सर्व कवींचा सत्कार स्मृतिचिन्हे देऊन करण्यात आला. नंतर त्यांचे कविसंमेलन झाले. ह्या काव्यवाचन स्पर्धेसाठी श्री. मधू नेने व डॉ. कल्याण इनामदार यांनी संयोजक म्हणून काम केले होते.

याच निमित्ताने महाविद्यालयीन विद्यापीठ स्तरावर मराठी काव्यलेखनस्पर्धासुद्धा आयोजित करण्यात आली होती.

या स्पर्धेतील प्रथम क्रमांक पटकाविणारे श्री. दिनेश मधुकर शिंदे रोख पारितोषिक स्वीकारण्यासाठी ७ नोव्हेंबरला उपस्थित होते.

या दोन्ही काव्यस्पर्धांमध्ये भाग घेणाऱ्या कवींच्या उत्स्फूर्त उपस्थितीने व कविसंमेलनातील सहभागाने पारितोषिक वितरण समारंभ अक्षरश: गाजला. त्याच रात्री झालेल्या कविसंमेलनाचे सूत्रसंचालन डॉ. कल्याण इनामदार यांनी केले. कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. रवींद्र भट यांनी संपूर्ण सूत्र सांभाळले. डॉ. इनामदार व मधू नेने यांनी स्पर्धेविषयी निवेदन करून आभार मानले, कार्यक्रमाच्या प्रमुख पाहुण्या श्रीमती पेंडसे-नाईक व परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांची यथोचित भाषणे झाली. या कार्यक्रमास सकाळ वृत्तपत्रसमूहाचे माध्यमप्रायोजकत्व लाभले.

**दि. १६ नोव्हेंबर २००५ श्रद्धांजली सभा :** के. आर. नारायणन्, द्वा. भ. कर्णिक, दिनकर द. पाटील, गो. रा. जोशी, निर्मल वर्मा, अमृता प्रीतम, योगिनी जोगळेकर, स. मा. गर्गे, शैला सायनाकर आणि मधू दंडवते या दिवंगतांस श्रद्धांजली वाहण्यात आली.

त्यांच्यासंबंधी श्रद्धांजलीपर भाषणे रवींद्र भट, ल. ना. गोखले, सुमेधा देशपांडे, चंद्रकांत बांदिवडेकर, सुनेत्रा ओक, प्राचार्य ज्योती गायकवाड, मंगला आठलेकर, डॉ. अरविंद लेले या वक्त्यांनी केली.

**दि. २६ नोव्हेंबर २००५ आहिताग्नी राजवाडे स्मृतिदिन :** 'वैदिक तत्त्वचिंतनातील ऋतवाद' या विषयावर सुप्रसिद्ध वक्ते डॉ. मुकुंद दातार यांचे चिंतनपर भाषण झाले. प्रास्ताविक डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी व स्वागत परिचय व समारोप प्रमुख कार्यवाह रवींद्र भट यांनी करून दिला व स्थानिक कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**दि. २८ नोव्हेंबर २००५ :** नवनिर्वाचित संमेलनाध्यक्ष लेखक मा. मारुती चितमपल्ली यांचा सत्कारसोहळा परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. श्री. विवेक देशपांडे व विश्वस्त डॉ. वि. वि. घाणेकर यांची गौरवपर भाषणे झाली. अनेक साहित्यिक, सांस्कृतिक व सामाजिक क्षेत्रातल्या संस्था व व्यक्तींनी माननीय चितमपल्ली यांचा हृद्य सत्कार केला. परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले तर प्रमुख कार्यवाह रवींद्र भट यांनी सूत्रसंचालन केले. स्थानिक कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले. या सत्कारसमारंभास साहित्यप्रेमी रसिकांचा उत्स्फूर्त प्रतिसाद मिळाला.



अनुक्रमणिका






**दि. २९ नोव्हेंबर २००५ :** कवी माधव जूलियन स्मृतिदिन परिषदेने खास निमंत्रित केलेल्या पुण्यातील 'काव्यशिल्प' या कवी आणि रसिकांच्या संस्थेच्या काही निवडक कवींनी सादर केलेल्या काव्यवाचनाने सुमारे दीड तास रंगला. काव्यशिल्पच्या अध्यक्ष सौ. स्वाती सामक व मनोहर सोनवणे यांनी सूत्रसंचालन केले. परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. कवि-संमेलनात काव्यशिल्प, पुणे या संस्थेच्या जयंत भिडे, गुरुराज गर्दे, डॉ. मधुसूदन घाणेकर, दीपक करंदीकर, सु. वि. पारखी, विद्याधर दांडेकर, डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, प्रभा सोनवणे, जोत्स्ना चांदगुडे, कविता कुलकर्णी, स्नेहा केसकर, सुनिती लिमये, या सर्वांनी आपल्या प्रत्येकी दोन काव्यरचना सादर केल्या. शेवटी परिषदेचे प्रमुख कार्यवाह रवींद्र भट यांनी तिथीप्रमाणे असलेल्या, संत ज्ञानेश्वर संजीवन समाधी दिनाचे निमित्त साधून स्वत:ची एक रचना सादर केली. माधव जूलियन यांचे चिरंजीव कॅप्टन दिनकरराव पटवर्धन या कविसंमेलनास आवर्जून उपस्थित होते.

## दि. ७ नोव्हेंबर २००५ कवी केशवसुत स्मृतिशताब्दी व मसाप शताब्दीनिमित्त

कवी केशवसुत स्मृतिशताब्दी महाविद्यालयीन/विद्यापीठ स्तरीय मराठी काव्यलेखन स्पर्धा

**संयोजक –** दीपक करंदीकर, स्थानिक कार्यवाह

कवी केशवसुतांच्या स्मृतिशताब्दी आणि म. सा. परिषदेची शताब्दी या निमित्ताने म. सा. परिषदेतर्फे महाविद्यालयीन/विद्यापीठीय स्तरावर मराठी काव्यलेखन स्पर्धा १५ ऑगस्ट ते ३० ऑक्टोबर दरम्यान आयोजित करण्यात आली होती.

कविता पाठविण्याची अंतिम तारीख ३१ ऑगस्ट २००५ पर्यंत होती. महाराष्ट्रातील सुमारे ४२५ महाविद्यालयांना स्पर्धेचे माहितीपत्रक व आवेदन-पत्रे पाठविण्यात आली. परिषदेच्या आवाहनास महाराष्ट्रातील सर्व दूरच्या भागातील महाविद्यालयांतून तसेच विविध विद्यापीठांतील कवींच्या कवितांचा अगदी भरघोस प्रतिसाद मिळाला. चंद्रपूर, नागपूर, अमरावती, नाशिक, नंदूरबार, औरंगाबाद, पुणे, मुंबई, ठाणे, सांगली, सातारा, कऱ्हाड, कोल्हापूर, रत्नागिरी, सावंतवाडी, महाड, चिपळूण अशा महाराष्ट्रातील सर्व भागांतून सुमारे ५५० काव्यरचना आल्या.

या सर्व सहभागी कवींच्या नाव-पत्त्यांची पाकिटे, आवेदनपत्रे व स्पर्धेसाठीच्या कविता यांची प्राथमिक वेगवेगळी नोंद करण्यास एक महिन्याचा कालावधी लागला.

त्यानंतर प्रा. प्र. ना. परांजपे, डॉ. अश्विनी धोंगडे, डॉ. नीलिमा गुंडी या तिघांनी परीक्षक म्हणून काम केले. त्यानंतर डॉ. गं. ना. जोगळेकर व डॉ. अरुणा ढेरे यांनी अंतिम फेरीचे परीक्षक म्हणून काम केले.



अनुक्रमणिका






## कवि केशवसुत स्मृति-शताब्दी व म. सा. प. शताब्दी निमित्त महाविद्यालयीन / विद्यापीठ स्तरावरील मराठी काव्यलेखन स्पर्धा
## अंतिम निकाल

| अनु | सहभागी कवीचे नाव | विद्यापीठ/महाविद्यालयाचे नाव/पत्ता | विद्यार्थी शिकत असलेले वर्ष | स्पर्धेतील यशस्वी कवीचा क्रमांक | पारितोपिकाची रक्कम | कवितेचे शीर्षक |
|---|---|---|---|---|---|---|
| १) | दिनेश मधुकर शिंदे<br>मु. दहिवद, पो. पाटे,<br>ता. चादवड,<br>जि. नाशिक–४२३१०१ | कलो, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, लासलगांव<br>ता. निफाड,<br>जि. नाशिक-४२२३०६ | तृतीय वर्ष<br>विज्ञान शाखा | प्रथम क्रमांक | रु. २०००/- | 'उमेद' |
| २) | ज्ञानदेव कोंडीभाऊ वटाणे<br>द्वारा. एस. एम. कांबळे<br>भीमनगर, भावसिंगपुरा,<br>औरंगाबाद | अर्थशास्त्र विभाग<br>डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ,<br>औरंगाबाद-४३१००४ | एम. ए. प्रथम वर्ष<br>अर्थशास्त्र | द्वितीय क्रमांक | रु. १५००/- | 'बाप' |
| ३) | अतुल विश्वेश्वरराव खोडे<br>मु. पो. वाढोणा, ता. आर्वी<br>जि. वर्धा | कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, आर्वी,<br>जि. वर्धा | बी.ए. भाग-३ | तृतीय क्रमांक | रु. १०००/- | 'कधी कधी' |

| क्र. | नाव व पत्ता | महाविद्यालय | वर्ग | पारितोषिक | रक्कम | लेख |
|---|---|---|---|---|---|---|
| ४) | नानासाहेब महादेव गव्हाणे ४४, विठाई, श्रीदेवीनगर-१ आकाशवाणी केंद्राजवळ, एम. आय. डी. सी. रस्ता, सोलापूर–४१३००६ | वालचंद कला व शास्त्र महाविद्यालय, सोलापूर | बी.ए. भाग-१ | उत्तेजनार्थ | रु. १००/- | 'सुख-दुःख' |
| ५) | सुनील कालिदास जंवजाळ (वेगळा पत्ता नाही.) | विज्ञान महाविद्यालय सांगोला, जि. सोलापूर पिन - ४१३३०७ | बी.ए. भाग-२ | उत्तेजनार्थ | रु. १००/- | 'गुरुजी माझं पोरगं परत द्या.' |
| ६) | ऐश्वर्या एकनाथ धामणे कोकंबाआली, दापोली ता. दापोली, जि. रत्नागिरी | न. का. वराडकर कला आणि आर. व्ही. बेलोसे वाणिज्य महाविद्यालय, दापोली, जि. रत्नागिरी | १२ वी कला 'अ' | उत्तेजनार्थ | रु १००/- | 'मरणालाही अर्थ नसतो.' |
| ७) | कु. सुरेखा विश्वनाथराव घुगे रा. सोलसुरा, ता. पो. कळमनुरी, जि. हिंगोली-४१३५१३ | आदर्श कॉलेज, हिंगोली जि. हिंगोली -४१३५१३ | बी. ए. तृतीय वर्ष | उत्तेजनार्थ | रु १००/- | 'मी मुलगी म्हणूनच ना?' |
| ८) | कु. दीपाली कृष्णरावजी फटिंग सिरसपेठ, मठ्ठीपुरा, नवीन वस्ती, रेशीम बाग महाल, नागपूर | महिला महाविद्यालय (जुने नागपूर) | ११ वी 'अ' | उत्तेजनार्थ | रु. १००/- | 'सोबत' |

प्रथम क्रमांकाने यशस्वी झालेले भुपोद हिवद, जि. नाशिकचे स्पर्धक श्री. दिनेश मधुकर शिंदे (तृतीय वर्ष विज्ञान शाखा) हे प्रमुख पाहुण्या श्रीमती वसुंधरा पेंडसे-नाईक यांच्या हस्ते रोख पारितोषिक स्वीकारण्यासाठी स्वत: आवर्जून उपस्थित होते.

**दीपक करंदीकर**

स्थानिक कार्यवाह, म. सा. परिषद. पुणे

## ठाणे जिल्हा शाखा

गत तीन महिन्यांत शाखेद्वारा आयोजित केलेले कार्यक्रम येणेप्रमाणे :

**१४ ऑगस्ट २००५** यादिवशी म.सा.प. पुणे या संस्थेच्या सहकार्याने केशवसुत स्मृतिशताब्दीनिमित्त ठाणे केंद्रात खुली काव्यस्पर्धा आयोजित केली होती. या स्पर्धेत ५६ कवींनी भाग घेतला. परीक्षक म्हणून डॉ. कल्याण इनामदार व मधु नेने यांनी काम पाहिले. या स्पर्धेत ठाणे केंद्रात पुरस्कारविजेते येणेप्रमाणे– गीतेश शिंदे, हरेश महाजन व सुनीती काशीकर.

**२५ सप्टेंबर २००५** रोजी मराठी ग्रंथ संग्रहालय, ठाणे, आचार्य अत्रे कट्टा, नौपाडा व म.सा.प. ठाणे जिल्हा शाखेच्या संयुक्त विद्यमाने एक दिवसाचा साहित्य रसिक मेळावा आयोजित केला होता. यावेळी अध्यक्षस्थानी सुप्रसिद्ध पत्रकार कुमार केतकर होते. प्राचार्य डॉ. दाऊद दळवी यांनी स्वागताध्यक्षस्थान भूषविले. 'प्रसारमाध्यमांमुळे साहित्याची पीछेहाट होत आहे का?' याविषयावर आयोजित परिसंवादात जयू भाटकर, विलास मुणगेकर प्रा. मीनल सोहोनी, प्रशांत दीक्षित यांनी भाग घेतला. डॉ. अनंत देशमुख अध्यक्षस्थानी होते. साहित्य अभिवाचन यात अनंत मराठे, रवींद्र दातार, शीला मराठे, रत्नाकर निफाडकर व वासंती वर्तक यांनी भाग घेतला. सौ. मोहिनी निमकर यांनी 'हास्यदिंडी' हा कार्यक्रम सादर केला. शेवटी डॉ. र. म. शेजवलकर यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन झाले. सुमारे २०० रसिक सहभागी झाले.

**२ ऑक्टोबर २००५** रोजी प्रा. म. वि. फाटक स्मृतिपुष्प डॉ. अनुपमा उजगरे यांच्या 'रेव्हरंड टिळकांची कविता' या विषयावरील भाषणाने गुंफले गेले. 'टिळकांच्या कविता सोज्वळ व शालीन होत्या. केशवसुतांच्या आधी मराठी कवितेला नवे वळण लावण्याचा प्रयत्न टिळकांनी केला असताना नवकवितेचा प्रारंभ केल्याचे श्रेय टिळकांना दिले जात नाही' असे त्या यावेळी बोलताना म्हणाल्या, फाटक स्मृतिपुष्पाचे हे १८ वे वर्ष होते.

**पद्माकर शिरवाडकर**

कार्यवाह.

## इस्लामपूर शाखा

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या इस्लापूर शाखेने जुलै ते सप्टेंबर २००५ या तिमाहीत जे उपक्रम आयोजित केले. त्यांचा थोडक्यात अहवाल पाठवीत आहे.

**१४ जुलै २००५ :** महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या इस्लामपूर शाखेचे माजी अध्यक्ष कै. प्राचार्य शरद भोसले यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. ल. रा. नसिराबादकर यांचे 'तुका झालासे कळस' या विषयावर व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी प्रा. शामराव पाटील होते. यावेळी केंद्रीय कार्यकारिणी सदस्या डॉ. दीपा देशपांडे, प्रा. दशरथ पाटील, श्री. धोंडीराम सलगर, प्राचार्य विश्वास सायनाकर, प्राचार्य आर. डी. सावंत, प्राचार्य तांबोळी, प्राचार्य दाभोळे इ. मान्यवर उपस्थित होते. सूत्रसंचालन सौ. वृषाली आफळे यांनी केले.

**२४ जुलै २००५ :** इस्लामपूर येथील जुन्या पिढीतील ख्यातनाम तबलावादक कै. बाबालाल तबलजी यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ तबलावादन स्पर्धांचे आयोजन केले. या स्पर्धांचा शुभारंभ सुप्रसिद्ध तबलावादक श्री. रमाकांत देवळेकर (तात्या) यांच्या हस्ते व पं. हणमंतराव जाधव (पापा) यांचे अध्यक्षतेखाली झाला. तर बक्षीसवितरण नगराध्यक्ष श्री. विजयभाऊ पाटील यांचे हस्ते झाले. या स्पर्धांचे संयोजन प्रा. दशरथ पाटील व सौ. वृषाली आफळे यांनी केले.

**२१ ऑगस्ट २००५ :** इस्लामपूर शहरातील ख्यातनाम धन्वन्तरी डॉ. शिवाजीराव घोरपडे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ बेळगावचे सुप्रसिद्ध हृदयशल्यविशारद डॉ. एम. डी. दीक्षित यांचे 'ताण-तणाव व आरोग्यदायी जीवनशैली' या विषयावर व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी इस्लामपूर येथील प्रसिद्ध डॉ. प्रदीप शहा होते. या प्रसंगी प्रा. शामराव पाटील, डॉ. दीपा देशपांडे, डॉ. बाळासाहेब नेर्लेकर, प्राचार्य सायनाकर, प्राचार्य निपाणीकर उपस्थित होते. सूत्रसंचालन सौ. वृषाली आफळे यांनी केले. तर प्रास्ताविक महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष धोंडीराम सलगर यांनी केले.

**५ सप्टेंबर २००५ :** शिक्षक दिनानिमित्त वाळवे तालुक्यातील आदर्श शिक्षक पुरस्कारप्राप्त व इतर ज्येष्ठ शिक्षकांचा सन्मान प्रा. शामराव पाटील यांचे हस्ते करण्यात आला. अध्यक्षस्थानी जागर साहित्य कलामंडळाचे अध्यक्ष प्रा. वि. द. कदम होते.

**१८ सप्टेंबर २००५ :** कविवर्य केशवसुत स्मृतिशताब्दीनिमित्त सांगली जिल्ह्यातील जिल्हास्तरीय काव्यवाचन स्पर्धांचे आयोजन केले. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पुणे येथील केंद्रीय कार्यकारिणीचे सदस्य, डॉ. कल्याण इनामदार व श्री. मधू नेने, वाई हे या स्पर्धांचे परीक्षक होते. त्यांनीही आपल्या काही कविता सादर केल्या. या स्पर्धांचे संयोजन सांगली जिल्हा प्रतिनिधी प्राचार्य डॉ. दीपा देशपांडे व सौ. वृषाली आफळे यांनी केले.

**५ ऑक्टोबर २००५ :** कविवर्य केशवसुत स्मृतिशताब्दीनिमित्त प्राचार्य डॉ. दीपा देशपांडे यांचे 'केशवसुतांच्या कविता' या विषयावर व्याख्यान झाले. कार्यक्रमाचे अध्यक्ष

ज्येष्ठ समीक्षक प्रा. वि. द. कदम यांनीही केशवसुतांच्या काव्याविषयी विवेचन केले. यावेळी प्राचार्य डॉ. दीपा देशपांडे यांची शिवाजी विद्यापीठाच्या विधिसभेवर बिनविरोध निवड झाल्याबद्दल तसेच महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यकर्ते शाहीर यशवंत पवार यांना 'बाळासाहेब गलगले पुरस्कार' मिळल्याबद्दल प्रा. शामराव पाटील यांचे हस्ते त्यांचा सत्कार करण्यात आला.

**प्रा. शामराव पाटील**

सचिव म. सा. प., इस्लामपूर शाखा

## अहमदनगर शाखा

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नगर शाखेने आयोजित केलेल्या 'काव्य कोजागरी' कार्यक्रमास रसिक आणि कवींचा उत्स्फूर्त प्रतिसाद लाभला आणि कोजागिरीची रात्र कवींच्या काव्यमैफलीने रंगून गेली. कार्यक्रमात विवेक दसरे यांच्या '१६ कविता' या पहिल्या कवितासंग्रहाचे प्रकाशन डॉ. सुधा कांकरिया यांच्या हस्ते करण्यात आले. या कवितांचे गायनही यावेळी चैत्राली दिघे, डॉ. अभिजित कुलकर्णी, केदार तांबोळी, कुमारी कल्याणी यांनी केले. प्रारंभी कवी कुसुमाग्रज यांच्या प्रतिमेचे पूजन डॉ. सुधा कांकरिया, चंद्रकांत पालवे, किशोर मरकड यांच्या हस्ते झाले. प्रमुख पाहुणे म्हणून आकशवाणीचे संचालक लियाकत अली सय्यद उपस्थित होते. रात्री रंगलेल्या कविसंमेलनात ल. धो. खटाडे, अनिकेत कराळे, एम. पी. दिवाण, डॉ. मुकुंद देवललीकर, दिलीप शहापूरकर, य. वि. जोशी, सुनील कात्रे, किशोर मरकड, क्रांती अनभुले, अमोल बागूल, अशोक फटांगरे, ज्योत्स्ना कुलकर्णी, सुनंदा कुलकर्णी, प्रांजला देशपांडे, संदीप खेडेकर, डॉ. मधुसूदन बोपर्डीकर, सुनंदा धर्माधिकारी, भास्करराव दिक्कर आदींनी कवितावाचन केले. सूत्रसंचालन चंद्रकांत पालवे यांनी केले. आभार. प्रा. चं. वि. जोशी यांनी मानले.

## जळगाव शाखा

**भादली :** बालकवी त्र्यंबक बापूजी ठोंबरे यांच्या जयंतीदिनी भादली बु।। रेल्वे स्थानकावर त्यांच्या स्मारकाच्या ठिकाणी काव्यवाचनाचा कार्यक्रम झाला. बालकवींच्या पुतळ्यास त्यांच्या 'निर्झरास' या कवितेचे वाचन करून आदरांजली अर्पण करण्यात आली. यावेळी म. सा. प.चे पदाधिकारी भादली रेल्वे स्टेशनचा कर्मचारी वर्ग, भादली पशुखाद्य कर्मचारी आणि साहित्यिक उपस्थित होते. म. सा. प. जळगाव शाखेचे अध्यक्ष मा. नारायण शिरसाळे यांच्या अध्यक्षतेखाली वृक्षांच्या घनदाट छायेत काव्यसंमेलन रंगले. कार्याध्यक्ष दिनेश पाटील यांनी सूत्रसंचालन केले. कवी प्रकाश तेलंग, काशिनाथ भारंबे, अरविंद नारखेडे, लक्ष्मण तिवारी, कवयित्री विमल वाणी, शुभांगी कुलकर्णी, सुरेखा

राजवैद्य, श्रीमती के. यू. शेख, विमल सुरडकर यांनी काव्यवाचन केले.

कवी केशवसुत स्मृतिशताब्दीनिमित्त जिल्हा कविसंमेलन नूतन मराठा महाविद्यालयाच्या राजर्षी शाहू महाराज सभागृहात झाले. कवी केशवसुत यांच्या प्रतिमेचे पूजन म. सा. प. पुणे, कार्यवाह डॉ. प्रा. कल्याण इनामदार यांनी केले. प्रथम दिवंगत साहित्यिक डॉ. मिरदेव गायकवाड, प्रा. गणेश कुडे, कवयित्री उमादेवी, यांना श्रद्धांजली वाहण्यात आली. परीक्षक म्हणून डॉ. प्रा. कल्याण इनामदार व वाई म. सा. प. शाखेचे अध्यक्ष मधू नेने होते. हा कार्यक्रम कवी नारायण शिरसाट यांचे अध्यक्षतेखाली संपन्न झाला. म. सा. प. चे कार्याध्यक्ष प्रा. दिनेश पाटील व कोषाध्यक्ष प्रा. पी. बी. चौधरी यांनी पाहुण्यांचे स्वागत केले. कार्यक्रमाचे संचलन मधू वाघोडकर यांनी केले. या स्पर्धेत कवी गो. शि. म्हसकर (नगरदेवल), भगवान भटकर (जळगाव), प्रभाकर महाजन (एरंडोल) यांच्या कवितांची अनुक्रमे निवड झाली. यावेळी ९२ कवींनी सहभाग नोंदवला.

नोव्हेंबर ०५ ला कवी केशवसुतांचे वास्तव्य असलेल्या गावी भडगाव येथे कवी केशवसुत स्मृतिशताब्दी महोत्सवाचा सांगता समारंभ घेण्यात आला. 'एक दिवशीय' या कार्यक्रमाची सुरुवात सकाळी १० वा. झाली. केशवसुतांच्या प्रतिमेचे पूजन झाल्यानंतर डॉ. अर्जुन बावळे यांच्या अध्यक्षतेखाली सामाजिक क्रांतीचे उद्‌गाते कवी केशवसुत या विषयावर प्रा. बी. डी. शिंदे, प्रा. पी. पी. पाटील आणि डॉ. अर्जुन बावळे यांची भाषणे झाली. केशवसुतांच्या पाच कवितांचे वाचन पाच कवींनी केले. कथाकथनाच्या कार्यक्रमात प्रा. गोकुळ बागूल, अशोक कौतिक कोळी, वाल्मिक अहिरे यांनी आपल्या कथा सांगितल्या. या कार्यक्रमास कथालेखिका प्रा. विमल वाणी या अध्यक्षा होत्या. दुपारी जेवणानंतर कवी मधू वाघोडकर यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलनाचा कार्यक्रम सायंकाळी सहा वाजेपर्यंत चालला. यावेळी ३५ कवींनी काव्यवाचन केले. यासाठी अखिल भारतीय खानदेश अकादमीचे अध्यक्ष वाल्मिक अहिरे, सचिव दीपक मराठे, प्रा. सुरेश कोळी व इतर स्थानिक संस्थांचे सहकार्य लाभले. म. सा. प. अध्यक्ष नारायण शिरसाळे यांनी आयोजकांना धन्यवाद दिले व आभार मानले. यावेळी साहित्यिक, म. सा. प. चे पदाधिकारी व सदस्य यांची उपस्थिती होती.

**नारायण शिरसाळे**
अध्यक्ष, जळगाव शाखा

## सोलापूर शाखा

केशवसुत स्मृतिशताब्दीनिमित्त कविसंमेलन आयोजित करण्यात आले होते. जिल्ह्यातील एकूण ३२ नवोदित कवींनी यात भाग घेतला होता. परीक्षक म्हणून म.सा.प. पुण्याचे डॉ. कल्याण इनामदार व डॉ. मिरदेव गायकवाड उपस्थित होते. कविसंमेलनात पंढरपूर,











अकलूज, बार्शी, अक्कलकोट, मंगळवेढा येथील कवींनी भाग घेऊन हा कार्यक्रम अत्यंत बहारदार असा केला होता.

**दि. ७ ऑगस्ट २००५ रोजी** सोलापूर शाखेने सोलापुरातील दिग्गज दिवंगत कवींच्या सदनावर त्यांच्या नावाचा नीलफलक लावण्याचा उपक्रम हाती घेतला. पहिला फलक कविराय रामजोशी यांच्या निवासस्थानी नटवर्य भालचंद्र पेंढारकर यांच्या हस्ते व श्री. विजय कुवळेकर यांच्या प्रमुख उपस्थितीत लावण्यात आला. या उपक्रमाचे शहरातील रसिकांनी स्वागत केले. या कार्यक्रमास म.सा.प. सोलापूर शाखेचे कार्यकारिणी सदस्य व असंख्य नगरजन उपस्थित होते.

**दि. ९ ऑगस्ट २००५ रोजी** 'माझे आवडते पुस्तक' या उपक्रमांतर्गत रसग्रहणात्मक कार्यक्रम सेवासदन प्रशाला सभागृहात संपन्न झाला. मा. धुंडिराज कुर्डूकर 'टाहो' कादंबरी, सौ. प्रिती चिलगवार– 'युगंधर' कादंबरी आणि ॲड. जे. जे. कुलकर्णी– 'अक्षरनिष्ठांची मांदियाळी', यांनी पुस्तकांचा आशय व लेखनशैली उलगडून सांगितली.

---

## साभार पोच

**चंद्रशेखर :** माधुरी शानभाग, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ १७२
**न्यूझीलंडसाठी भारत सोडताना :** कल्याणी गाडगीळ, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ९६
**भाषा : स्वरूप, सामर्थ्य व सौंदर्य :** वामन केशव लेले, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ९८
**गाणारं झाड :** स्वाती ठकार, ब्रह्मचैतन्य प्रकाशन, पृष्ठ ६८
**अक्षर नारायणी ;** देवीदास फुलारी, संगत प्रकाशन, नांदेड, पृष्ठ ११२
**महिला सबलीकरणाची नवी दिशा :** सुमती चौगुले, इंदुजा प्रकाशन, मिरज, पृष्ठ ५९
**पालखी :** मीनाक्षी सरदेसाई, मधुश्री प्रकाशन, पुणे, पृष्ठ १३६
**कोवळी दुःख :** मीनाक्षी सरदेसाई, मधुश्री प्रकाशन, पुणे, पृष्ठ १३६
**वाटेवरल्या सावल्या :** अनिल पांढारकर, प्रियांजली प्रकाशन, पुणे, पृष्ठ १४०
**जास्वंदी :** दिनेश पांगम, प्रियांजली प्रकाशन, पुणे, पृष्ठ १५०
**संत तुकारामांचे सदेह वैकुंठगमन :** एकनाथ राजगुरु, प्रकाशक स्वत: लेखक, वाशिम, पृष्ठ १६८
**फरपट :** सुचिता बर्वे, प्रकाशक मंगेश वाडेकर, पुणे, पृष्ठ ३०२
**ब्रह्मसोपान :** सुरेश आकोटकर, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठ ९६
**डागण्या :** आप्पा क़दम, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठ ८४
**परवड :** बाबूराव उपाध्ये, निर्मोही प्रकाशन, पुणे, पृष्ठ १४४
**अव्यय :** अनघा वैद्य, आँथेन्टिकोस मिडीया एनमास प्रकाशक, नासिक, पृष्ठ ९४
**महाराष्ट्रातील नद्या :** श्रीकांत तापीकर, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ ७२
**जा ऊडुनि जा पाखरा :** रिजवान कश्यप, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठ ९६

**१२ ऑगस्ट २००५ रोजी** आचार्य अत्रे जयंतीच्या पूर्वसंध्येला, अत्रेभक्त कै. वा. ग. काटकर यांच्या पूर्वनियोजित उपक्रमानुसार 'आचार्य अत्रे साहित्यिक आणि पत्रकार' या विषयावर पत्रकार मधुकर भावे यांचे व्याख्यान झाले. कै. वा. ग. काटकर यांच्या कन्या सौ. मीना गोळे या अत्यंत आवर्जून या कार्यक्रमास उपस्थित होत्या.

**१४ ऑगस्ट रोजी** म.सा.प. शाखा सोलापूर व सुविद्या प्रकाशनातर्फे शोभा देशपांडे यांच्या 'ऋणमुक्त' या कथासंग्रहाचे व 'तुपाची घागर' या बालकथासंग्रहाचे प्रकाशन बेळगावच्या लेखिका सौ. माधुरी शानबाग यांच्या हस्ते झाले. अध्यक्षस्थानी सौ. सुरेखा शहा या होत्या.

**दि. २४ ऑगस्ट रोजी** म.सा.परिषद सोलापूर शाखा, सेवासदन संस्था आणि बालकुमार साहित्य संमेलन संस्था यांच्या संयुक्त विद्यमाने, लेखिका सौ. विजया जहागीरदार यांना कै. दिनकर लोखंडे पुरस्कार बहाल करण्यात आला. अध्यक्षस्थानी डॉ. सौ. माधवी रायते या होत्या.

**दि. ३१ ऑगस्ट २००५ रोजी** 'सासर-कालचे व आजचे' या महिलांसाठी आयोजित केलेल्या निबंधस्पर्धेचा बक्षीसवितरण समारंभ सौ. अपर्णा रामतीर्थकर यांच्या अध्यक्षतेखाली झाला. या स्पर्धेत ६० महिलांनी भाग घेतला होता.

**दि. ९ ऑक्टोबर २००५ रोजी** म.सा.प. च्या सदस्या सौ. निर्मला मठपती यांच्या 'पहाट वाऱ्यासंगे', 'चांदोबाचा झुला' व 'इंद्रधनुचा गोफ' या कवितासंग्रहाचे प्रकाशन 'गोविंदश्री' या सांस्कृतिक भवनात, प्रख्यात साहित्यिक श्री. दत्ता टोळ यांच्या हस्ते झाले. अध्यक्षस्थानी सोलापूर विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. इरेश स्वामी हे होते. हा समारंभ म. सा. परिषद आणि सुविद्या प्रकाशन यांच्या वतीने झाला.

### श्रद्धांजली

**दि. १० जुलै २००५ रोजी** म.सा.प. पुण्याचे कार्यकारिणी सदस्य डॉ. मिरदेव गायकवाड यांच्या दुःखद निधनानिमित्ताने म.सा.प. सोलापूर शाखेने भावपूर्ण श्रद्धांजली अर्पण केली.

### नामफलक अनावरण

सोलापूरचे थोर स्वातंत्र्यशाहीर कवी कुंजविहारी आणि प्रख्यात कवी कै. रा. ना. पवार यांच्या निवासस्थानी साहित्य परिषद आणि चंडक ट्रस्टच्या वतीने सदरहू साहित्यिक येथे राहात होते, अशा मजकुराचे नामफलक प्रख्यात नट व दिग्दर्शक प्रभाकर पणशीकर यांच्या हस्ते, दि. ६ नोव्हेंबर २००५ रोजी लावण्यात आले.

**लक्ष्मीनारायण बोल्ली**
कार्याध्यक्ष.

❑

## आजीव सभासद यादी

१) सोमण चंद्रहास मुकुंद, पुणे
२) शिरोडकर शेळके तेजस्विनी, पुणे
३) दीक्षित नंदन सदाशिव, पुणे
४) ढोले संजय दगा, पुणे
५) बर्दापूरकर तारा शरद, भिवंडी
६) राजदेरकर रवींद्र मुरलीधर, भिवंडी
७) चव्हाण विश्वास मधुकर, धुळे
८) आगरकर राजगुरू दत्तात्रय, सोलापूर
९) पटवर्धन वैजयंती संजीव, पुणे
१०) पाटील शिवाजी विष्णू, सातारा
११) तांबोळे खुदाबकस चांदसाहेब इनामगाव
१२) अत्रे मधुकर वामन, पुणे
१३) कड सारिका चंद्रकांत, पुणे
१४) शिगटे सुरेश हरिभाऊ, विरमाड
१५) असवडेकर दीप्ती दीपक, पुणे
१६) शेणाय प्रकाश पुंडलिक, पुणे
१७) सोनार आर. डी., भिवंडी
१८) रजपूत सुगंधा मोहनसिंग, धुळे
१९) कुलकर्णी वंदना अनिल, सोलापूर
२०) बिराजदार भिमाशंकर शरणाप्पा, सोलापूर
२१) राजेजाधव श्रीकृष्ण भगवंतराव (कृष्णाराजे), पुणे
२२) हिंगे शरद केशवराव, पुणे
२३) जवखेडकर वर्षा, पुणे
२४) फाटक रवींद्र शंकर, पुणे
२५) रायकर शुभांगी सीताराम, पुणे
२६) करंदीकर दीपक कृष्णाजी, पुणे.
२७) गोहाड चित्रा अनंत, पुणे
२८) सूर्यवंशी अभिमन्यू दोधाजी, पुणे
२९) सागर राजीव श्रीमंत, भोसरी
३०) हगवणे दत्ता, भोसले
३१) कटारिया सुरेश प्रकाश, चिंचवड
३२) रणपिसे शरद नामदेव, पुणे
३३) कुलकर्णी विष्णू नारायण, पुणे
३४) व्होटकर सुनिता अनिल, पुणे
३५) प्रभुमहांबरे स्नेहा सुवास (गोवा)
३६) देशपांडे राजेंद्र भालचंद्र, पुणे

## साभार पोच

**संमत विचार आणि नवी भारत विद्या :** मौज प्रकाशन, मुंबई तर्फे गुलमोहर बुक डेपो, कोल्हापूर, पृष्ठ ७८
**मंथन :** गोविंद तळवळकर, मौज प्रकाशन, मुंबई तर्फे गुलमोहर बुक डेपो, कोल्हापूर, पृष्ठ १७८
**बेबी बुमर्स :** सुनीता केळकर, अपूर्व पब्लिकेशन्स प्रा. लि., पुणे, पृष्ठ ७२
**राजवाड्यांच्या माहेरवाशिणी :** सुनीता केळकर, अपूर्व पब्लिकेशन्स प्रा. लि., पुणे, पृष्ठ ६४
**मेघवृष्टी :** जयराम खेडेकर, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठ ११२
**जीवन नरहची आसामी कविता :** अनुवाद शोभा नाईक, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठ ६४
**आवाळ ओल :** अभय कांडर, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठ ६४
**विलग :** गणेश आत्माराम वसईकर, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठ ८४



अनुक्रमणिका

## जानेवारी २००६ मध्ये होणाऱ्या म.सा.प. परीक्षांचे वेळापत्रक

| वार व दिनांक | स. १०-३० ते १-३० | दु. २-३० ते ५-३० |
|---|---|---|
| शुक्रवार १३-१-२००६ | **साहित्य प्राज्ञ प्रश्नपत्रिका-१** (अर्वाचीन मराठी गद्य-पद्य) १. सारे प्रवासी घडीचे, २. अंमलदार, ३. जोगिया **साहित्य विशारद प्रश्नपत्रिका -१** (वैचारिक निबंध) १. शतपत्रे २. अग्निनृत्य | **साहित्य विशारद प्रश्नपत्रिका-४** भारतीय साहित्य-शास्त्रीय मूलतत्त्वे |
| शनिवार १४-१-२००६ | **साहित्य प्राज्ञ प्रश्नपत्रिका -२** (ग्रंथकाराचा अभ्यास : पु. भा. भावे) १. सतरावे वर्ष २. अकुलिना ३. रक्त आणि अश्रू ४. वाकुल्या **साहित्य विशारद प्रश्नपत्रिका-२** (मध्ययुगीन गद्य व पद्य) १. ज्ञानेश्वरी अध्याय पहिला २. महानुभाव गद्य, (संपा. शं. गो. तुळपुळे) | **साहित्य विशारद प्रश्नपत्रिका -५** भाषा विज्ञान व व्याकरण |
| रविवार १५-१-२००६ | **साहित्य प्राज्ञ प्रश्नपत्रिका -३** (मराठीचे व्याकरण व लेखन) **साहित्य विशारद प्रश्नपत्रिका -३** एका अर्वाचीन वाङ्मय-प्रकाराचा अभ्यास : कथा | **साहित्य विशारद प्रश्नपत्रिका -६** उपयोजित मराठी |
| रविवार १५-१-२००६ | **प्रवेश प्रश्नपत्रिका -१** (गद्य व पद्य संग्रह) १. जाई जुई, २. काव्यगंगा **प्रथमा प्रश्नपत्रिका** घामाची फुले, व्याकरण व लेखन | **प्रवेश प्रश्नपत्रिका-२** व्याकरण, अलंकार लेखन व भाषांतर |

### साभार पोच

**निःशब्द कोलाहल :** धनंजय गोवर्धन, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठ १२८
**मातीची सावली :** स्टॅन्ली गोन्सालवीस, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठ १२८
**अमृता प्रीतम एक चिंतन :** श्रद्धा पराते, अंबिका प्रकाशन, नागपूर, पृष्ठ २२०
**देव अंधारी रडला :** गंगाधर जयपूरकर, रूपवेध प्रकाशन, परभणी, पृष्ठ १०८

## देणगीदारांची यादी

| | | | |
|---|---|---|---|
| शरद कृष्णाजी बोडस | १०००/- | शं. ना. नवरे | १५०१/- |
| वसंत वामन धुपकर | ५०१/- | रवीन्द्र भट | ५०००/- |
| रामचंद्र भि. कुलकर्णी | १००/- | मधू नेने | ३०००/- |
| मनोहर ज. चिटणीस | १००/- | पराग जोगळेकर | २०,०००/- |
| मधुसूदन कृ. प्रसादे | १००/- | शरद उपाध्ये | १०,०००- |
| माधव गंगाधर सोवनी | १००/- | मृणालिनी किर्लोस्कर | ५००१/- |
| हरिभाऊ द. प्रभुमिराशी | १००/- | नीला बोरवणकर | १०००/- |
| मे. आनंद मेडिकल्स | १००/- | मंगला गोडबोले | १०००/- |
| हेमा फडके | २६००/- | सनी वेल्ड प्रा. लि. | १०००/- |
| विजया कुंभोजकर | २०००/- | अरविंद्र बोंद्रे | ५००/- |
| मे. के. अलेक्झांडर | १०००/- | नीलिमा गुंडी | १००१/- |
| अनुराधा अभ्यंकर | १०००/- | नीला महाडिक | १०००/- |
| सिद्धेश्वर | १०००/- | सु. वा. जोशी | १०००/- |
| सादळकर | १०००/- | बी. व्ही. रोटकर | ५०००/- |
| राजेन्द्र चाफळकर | २०१/- | रवींद्र पिंगे | ११११/- |
| भालचंद्र धडफळे | १००/- | ओंकार शरद जोशी | १००१/- |
| सुभाष जोशी | १००/- | दिगंबर वासुदेव जोशी | १०००/- |
| श्रीधर सहस्रबुद्धे | ५००/- | केशव सखाराम ठाकूर | ३०००/- |
| वि. आ. बुवा | १०००/- | राजेन्द्र वाघेरे | १००/- |
| श्रीराम वसंत दाते | १०००/- | अजित जमदाडे | १००/- |
| विभास जोशी | १००१/- | पुरुषोत्तम बापट | १००/- |
| डॉ. सुनंदा परांजपे | ५०००/- | शाम उदास | १११/- |
| कांचन भावे | १०,०००/- | राजाभाऊ कुलकर्णी | १००/- |
| दीपक करंदीकर | २२००/- | दिलीप बापूराव घोडेकर | ३००/- |
| डॉ. दीपा देशपांडे | ५०००/- | बाळकृष्ण पेंडसे | १००१/- |
| | | मधुकर ना. गोगटे | ११०००/- |

### साभार पोच

**कासव ठसे :** व्यंकटेश वळसंगकर, मराठी साहित्य मंडळ, गुलबर्गा, पृष्ठ ५८

**सुसंस्कारी शिक्षण :** विद्या महामने, विद्या प्रीतम प्रकाशन, तरडगाव, पृष्ठ ३०

## साभार पोच

**कृषिसाधक :** जयंत पाटील, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ २३२
**मायिबुये आफ्रिका :** कल्पना गोसावी/देसाई, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ३८८
**चीनमधला डॉ. जिदुओ :** कल्पना गोसावी/देसाई, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ २३०
**ब्र :** कविता महाजन, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ४२०
**विल्यम शेक्सपिअर जीवन आणि साहित्य :** के. रं. शिरवाडकर, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ २२४
**नभ आक्रमिले :** मोहन आपटे, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ २२४
**नीरा ते कृष्णा :** विजयादेवी पटवर्धन, प्रकाशिका विजयादेवी पटवर्धन पुणे, पृष्ठ ३७०
**फुलराणीचे लग्न :** दमयंती पांढरीपांडे, प्रकाशक सु. श्री. पांढरीपांडे, नागपूर, पृष्ठ ५६
**साज सूर :** विमल काळे, वाङ्मय सेवा प्रकाशन, नासिकरोड, पृष्ठ १४४
**सुपर मॅन तिरसिंगराव :** आनंद घाटुगडे, वाङ्मय सेवा प्रकाशन, नासिकरोड, पृष्ठ ४८
**म्युझिक :** संगीता जोशी, वाङ्मय सेवा प्रकाशन, नासिकरोड, पृष्ठ ९६
**पानाच्या जाळीतून :** रोहिणी करंदीकर, वाङ्मय सेवा प्रकाशन, नासिकरोड, पृष्ठ ८०
**तथागतांची जीवनगाथा :** अप्पा अंभोरे, वाङ्मय सेवा प्रकाशन, नासिकरोड, पृष्ठ ९६
**थांब, रामराज्य येतंय :** प्रकाश त्रिभुवन, वाङ्मय सेवा प्रकाशन, नासिकरोड, पृष्ठ ४८

## 'राजहंस'ची कादंबरी क्षेत्रातली दमदार उतारी

| | |
|---|---|
| विजय तेंडुलकर | कादंबरी : एक<br>कादंबरी दोन |
| कविता महाजन | ब्र |
| अरुण साधू | मुखवटा |
| कमलेश वालावलकर | ...बाकी शून्य |
| मेघना पेठे | ॥नातिचरामि॥ |
| कल्पना गोसावी-देसाई | मयिबुये आफ्रिका<br>चीनमधला डॉ. जिंदुओ |
| माधुरी शानभाग | ब्रेनवेव्ह्ज |

**राजहंस प्रकाशन** १०२५ सदाशिव पेठ, नागनाथ पाराजवळ, पुणे ३०. ✆ २४४७३४५९.
४१ भवानी शंकर रोड, चितळे पथ कॉर्नर, दादर, मुंबई २८. ✆२४२२३९०१.
फोन : औरंगाबाद २३३४६०८ नागपूर २२९४२६५ नाशिक ९४२२२५२२०८ कोल्हापूर २६२४३०४
अकोला २४४२१३८ परभणी २२५५५० फोंडा २३१२३७५










Maharashtra Sahitya Partrika Quarterly-Oct.-Dec.2005 Registered with the Registrar of Newspapers for India Under N0, 6398/57

बुक पोस्ट

प्रती

प्रेषक : प्रमुख कार्यवाह

**महाराष्ट्र साहित्य परिषद** टिळक रस्ता, पुणे- ४११ ०३०.







